अनौपचारिक

# मुलाखती

*

यशवंत गोपाळ जोशी

*

"प्रसाद" रौप्यमहोत्सवी प्रकाशन

# अर्पण-पत्रिका

माझे स्नेही,
श्री. दि. वि. काळे

संपादक सह्याद्री यांस,

दुपारी, संध्याकाळी, पुन्हा सकाळी, आणि आज, उद्या, परवा, पुन्हा उद्या- प्रत्येक महिन्याची मुलाखत हाती पडेपर्यंत क्वचित् स्वतः व पुष्कळ वेळेला माणसे पाठवून ओळीनं माझ्याकडून अनौपचारिक मुलाखती लिहून घेण्याच्या त्यांच्या 'शांत-सत्याग्रहाबद्दल' त्यांची मुलाखत घेण्याच्या भरीस न पडता हे पुस्तकच त्यांस

**अर्पण**

—य. गो. जोशी

*

# अनुक्रमणिका

ओऽहो ! आजचा दिवस केवढा भाग्यवान। आज आम्ही आम्हांला कल्पना नसतानासुद्धा एका नवीनच दालनात 'विक्रमांचा उच्चांक' प्रास्थापित करीत आहोत. म्हणजे काय ? आमचे ती. यशवंत गोपाळ जोशी ( यांस आम्ही 'भाऊ' म्हणतो ) यांच्या एका नवीन पुस्तकास आज आम्ही प्रस्तावना लिहीत आहोत !

हा 'विक्रमांकाचा उच्चांक' आम्ही अशाकरिता म्हणत आहोत की, आज आमचे वय फक्त पाचशे-एकवीस दिवसाचे आहे ! ( म्हणजे किती वर्षं महिने होतात ते वाचकांनीच जरूर पडल्यास पाहावे-आम्हांस त्याचा अंदाज लागत नाही ! ) येवढया थोडया वयात आम्ही प्रस्तावना लिहावी

अशी आमच्या ती. भाऊंच्या मनात कशी कल्पना आली ते येथे विस्तार पूर्वक सांगत नाही - पण सांगतो !

घरात नासधूस करण्यात आम्ही फार पटाईत झालो आहोत. पुस्तकांची पहिली पाने टरकावण्यात तर आमचा हातखंडा आहे. घरी पुस्तकांचाच धंदा असल्यामुळे मी रोज एक दोन तरी पुस्तके फाडतो आणि घरचा धंदा म्हणून ती. भाऊंनाही ते परवडते.

एक दिवस चेष्टेने ती. भाऊ म्हणाले, हा पोर वाङ्मयात बरेच बंड करणार असे दिसते-हा नक्की पुरोगामी लेखक होणार-माझ्या पुस्तकांना तू प्रस्तावना लिहिशील काय रे ?'

तीच कल्पना आमच्या मनात भरली-अन् काय म्हणताताना 'ईश्वराची करणी आणि नारळांत पाणी' अगदी तसे झाले ! आम्हांस वयानुरूप लिहितावाचता येत नसल्यामुळे प्रस्तावनेची कल्पना आमच्या मनातच पालवली आणि ती. भाऊंच्या "अनौपचारिक मुलाखतीच्या" भावी आगामी पुस्तकास आम्ही प्रस्तावना लिहिण्याचे मनातल्या मनात ठरविले. आणि एक दिवस सकाळी आमच्या भगिनी ती. शांताताईची पाटी-पेन्सिल घेऊन आम्ही आपल्या रेघोट्यांच्या अभिनव पण सनातन लिपीत प्रस्तावना लिहून काढली.

ती. भाऊंनी ते जाणले आणि वडिलांच्या कृपाप्रसादे त्या आम्ही कल्पिलेल्या आणि रेघोट्यानी लिहून काढलेल्या प्रस्तावनेचे आज हे, प्राकृत मराठीत झालेले रूपांतर प्रियवाचक, आपल्या वाचनांत येत आहे !

येवढी प्रस्तावना केल्यानंतर-ज्या पुस्तकास आम्ही प्रस्तावना लिहि-

णार आहोत ते पुस्तक ( आमच्या प्रिय वाचकांच्या लक्षात आलेच असेल की ) आम्ही बिलकुल वाचलेले नाही. कारण की आम्हांस अद्याप वाचतांच येत नाही ! आणि आमच्या वडिलांच्याच काय पण एकंदर मराठी वाङ्मयाबद्दलची आमची रसिकता अद्याप उमलावयाची आहे-जागी व्हावयाची आहे ! तरीही विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहायचे आम्ही मनावर घेतले हे आमचे वैशिष्टय !

आज, खरे सांगावयाचे म्हणजे आम्हांस जर खरे कशात समाधान वाटत असेल, देशोन्नती वाटत असेल, समाजकारण वाटत असेल तर ते आम्हांस वेळच्या वेळीं 'ब्रु[1]' मिळणे, 'आपी[2]' मिळणे, 'भात' मिळणे, तसेंच 'खिच्ची[3]' 'पीली[4]' 'जीली[5]' इत्यादी मिळणे यांतच वाटते.

आज 'खाऊ' आणि भाऊ' हेच आमचे उत्कृष्ट मनोरंजन !

वाचक हो, स्पष्ट सांगा, पुढे आमच्या हातून काही देशसेवा, राष्ट्रोन्नती व्हावी असे आपणांस वाटत असेल, तर हे वर सांगितलेले जिन्नस आम्हांस वेळच्या वेळीं मिळावयाला नको काय ?

—आणि आम्हांस कळविण्यास आनंद वाटतो की, हे सर्व आम्हांस वेळच्या वेळी मिळते ! क्वचित् आम्हांस त्याकरिता रडण्याचाही सत्याग्रह करावा लागतो-पण त्यासही आमचाच गुण नडतो, हे आम्ही प्रांजलपणाने कबूल करतो !

आम्ही मूळचेच रडवे नसल्यामुळे आमच्या रडण्यातही आमच्या वडीलधाऱ्यांना एक प्रकारचे कूतूहल वाटते. आणि त्यामुळे काही वेळी

---

१ दूध २ आमटी ३ खिचडी ४ पोळी ५ जिलबी—अरेरे ! हेही सांगावं लागते !

आम्हांस अत्यंत प्रिय असलेला "आपी भात" आम्हांस वेळेवर मिळत नाही !

म्हणजे क्रौर्य पाहा, आमच्या रडण्याचेही आमचे वडीलधारे काही वेळेला खेळणे करतात !

आता "इकलून इकलून" मुद्द्यावर यावयाचे म्हणजे कळविण्यास संतोष वाटतो की आमची ही प्रस्तावना आमच्या वडिलांचे पुस्तक लिहून पुरे व्हावयाच्या आतच पुरी झाली ! वडिलांस वाटले की आम्हांस वेळ लागेल–पण तसे झाले नाही ! आम्ही प्रस्तावना लिहून मोकळे झालो आहोत. आता ती. भाऊंनी पुस्तक केव्हाही लिहून पुरे करावे !

पण येवढे मात्र निश्चित की, आमच्यासारख्या अज्ञ बालकांनीच इथून पुढे प्रस्तावना लिहाव्यात हेच सोयीच्या व शिस्तीच्या दृष्टीने अत्यंत योग्य, पद्धतशीर आणि उचित होय !

—कारण मग या वयाच्या अडोशाने प्रस्तावना-लेखकाचे जे एकमेव कार्य की, कोणत्याही पुस्तकाची बेहद्द स्तुती करणे, त्यातील नसत्या गुणांबद्दल जिभल्या चाटणे, तेवढ्या एका पुस्तकाने "महाराष्ट्राचे आणि महाराष्ट्र वाङ्मयाचे काही भलेबुरे केले आहे" असे प्रदीर्घ स्वरांत किंचाळून सांगणे, त्या पुस्तकाने पूर्वीच्या कित्येक नामवंत लेखकांस मागे टाकले असून कित्येकांस पुढे ढकलले आहे, इत्यादी जागतिक विधाने भरणे— इत्यादी बाललीला–प्रस्तावना-लेखकाच्या वयाला शोभूनच दिसतील नव्हे काय ?

सर्व जगाकडेच अत्यंत आदराने, कौतुकाने आणि आश्चर्याने पाहण्याचे आमचे हे वय असल्यामुळे या बालवयांत वाटेल ते शोभून दिसते; मग प्रस्तावना म्हणजे कोणत्या झाडाचा पाला !

लेखकांनी इथून पुढे आमच्यासारखा बालवयाचा प्रस्तावनालेखक गाठण्याची शिकस्त करावी, अशी आम्ही आमच्या पिढीतर्फे त्यांना आग्रहाची विनंती करतो.



—आणि आम्ही रेघोटयांच्या अभिनव पण सनातन पद्धतीने पाटीवर प्रस्तावना लिहून काढली !

या 'अनौपचारिक मुलाखती' आम्ही वाचलेल्या नसल्यामुळे प्रस्तावनेची पाने आम्हांला आता अशीच अवांतर अर्थात् 'मूलग्राही' चर्चेने भरून काढावी लागणार !

या पुस्तकांत ज्यांच्या मुलाखती घेतल्या आहेत, त्या मुलाखतीत आलेली काही माणसे आमच्या घरी ती. भाऊंच्याकडे नेहमी येताना

दिसतात. तेव्हा ती. भाऊंनी लिहिलेल्या 'अनौपचारिक मुलाखतींतील कांही मुलाखती खऱ्या असाव्यात आणि काही काल्पनिक असाव्यात असा आमचा, का कोणाला ठाऊक, समज झालेला आहे !

आणि माझे भावी क्रिकेट गुरुजी श्री. रा. रा. देशभक्त रंगा सोहनी यांच्या मुलाखतीत "महाराष्ट्राचे भावी क्रिकेटियर" म्हणून माझे नाव परवानगीशिवाय छापले आहे, तेवढयावरून या मुलाखतीतून "अनौपचारिक" भाग बराच असावा हे वाचकांनी ओळखलें आहे किंवा नाही आम्हास माहीत नाही–पण ते आम्ही ओळखले आहे. येवढे या प्रस्तावनाद्वारे आम्ही ती. भाऊंच्या नजरेस आणू इच्छितो !

प्रसिद्ध झालेल्या अनौपचारिक मुलाखतीपैकी काही काही मुलाखती फारच चांगल्या आहेत ! पण त्याचे कारण आम्ही आहोत, याचा 'अनौपचारिक मुलाखतीं' च्या कित्येक वाचकांस पत्ताही नसेल !

यांतील कित्येक मुलाखतींची अपुरी हस्तलिखिते "कागद फाडण्याचा" आमचा आवडता खेळ असल्यामुळे आम्ही तीनतीनदा फाडून टाकली होती ! काही मुलाखती 'चोळामोळा' करून निकामी करून टाकल्या होत्या. त्यामुळे त्या त्या मुलाखती ती. भाऊंस पुनः पुनः लिहाव्या लागल्यामुळे फारच चांगल्या झाल्या आहेत ! आता याचे श्रेय कोणास आहे, याचा या हकीकतीवरून वाचकांनीच निकाल द्यावा !

आतापर्यंत झालेल्या मुलाखतीत आमचे भावी क्रिकेट-गुरुजी श्री. रंगा सोहनी व वस्ताद सदू गोडबोले यांच्या मुलाखती पुढे आम्हांला समजायला लागल्यानंतर खूपखूप आवडण्याचा संभव वाटतो. कारण वरील दोन विभूतीपैकी एक पैलवान असून एक खेळाडू आहे; आणि

आमच्या या वयात बुद्धीपेक्षा धिंगामस्तीची आणि खेळण्याची आम्हास जास्त आवड असल्यामुळे आम्ही हे छातीठोक भविष्यकालीन विधान करीत आहोत ! श्री. रावसाहेब गो. ल. आपटे हा माणूस बरा असावा असे वाटते. त्यावरून आणि या 'अनौपचारिक मुलाखतींचा' उगम त्यांच्याच मुलाखतीपासून झालेला असल्यामुळे ती मुलाखत चांगलीच असावी असे वाटते.

—कारण की, तसे नसते तर 'सह्याद्री' मासिकाच्या संपादकांनी पुढील मुलाखती छापल्याच नसत्या ! गु. तात्यासाहेब केळकर यांसही श्री. गो. ल. आपटे यांची मुलाखत खूप आवडल्याचे आमचे ती. भाऊच एक दिवस घरी आनंदाने सांगत होते !

'प्रभात कवी' शांताराम आठवले हे आमच्याकडे नेहमी येतात. त्यांच्या कविता आणि पदे खूप लोकप्रियही आहेत. 'आधी बीज ऽ एकले'. पण प्रांजळपणाने सांगावयाचे तर या गृहस्थाविषयी मला कधीच आपलेपणा वाटला नाही आणि वाटणारही नाही असे वाटते !

कारण आमचे ती. भाऊ हे नुसते गद्यलेखक असूनही जर इतके 'तऱ्हेवाईक'—( या शब्दाचा अर्थ आम्हांस माहीत नाही. आमची आजी ती. भाऊंस या नावाने नेहमी संबोधते म्हणून हा शब्द आम्ही वापरला आहे. ) तर "कवी माणूस" काय असेल याची मला धास्तीच वाटते !

आमचे ती. भाऊ "कवी" नसूनसुद्धा आणि त्यांना गाणारा गळा नसूनसुद्धा लो. टिळकांच्या* "रंग नभाचे कसे तरी !" "ओळखून घ्या

* ही काव्ये लोकमान्य टिळकांचीं नसून प. कविश्रेष्ठ ना. वा. टिळक यांची आहेत असा लोकप्रवाद आहे. पण आमचा त्याच्यावर विश्वास नाही. लो. टिळकां-सारख्या विभूतींनीच असली सर्वांगसुन्दर काव्ये केली असली पाहिजेत असे आमचे प्रांजल मत आहे.

मज पुरता। खराच मी वेडा नुसता।" व श्री. शांताराम आठवले यांच्यासुद्धा कित्येक कविता वेळी-अवेळी गात असतात. त्यावरून श्री. शांताराम आठवले यांच्या संगतीने आमचे ती. भाऊ कधी तरी कवी बनणार अशी मला धास्ती वाटते! तेव्हा नुसता गद्यलेखक जर इतका 'तऱ्हेवाईक' तर–जो मूळचाच 'कवी' असेल तो आपल्या घरांत काव्यगायनाचा काय धिंगाणा घालीत असेल! कवीच्या घरी फोनोग्राफ असणारच नाही कारण तो असल्यानंतर फोनोग्राफची गरजच काय? (श्री. शांताराम आठवले यांच्या घरी आहे असे कळते) असे माझे मत आहे. आणि कवीच्या काव्यगायनाच्या या त्रासामुळे त्याच्या आवतीभोवतीची माणसे कसे दिवस काढीत असतील याची आम्हांस कल्पनाच करवत नाही! आम्हांस असे वाटते की, या गुणामुळे 'कवीस' वारंवार आपली बिऱ्हाडे बदलावी लागत असतील—आणि नवीन जागा मिळविण्यास त्यास पंचाईत पडत असावी! असो.

श्री. भाई ना. ग. गोरे हे आमच्या शेजारीच राहतात. गृहस्थ दिसायला बरा दिसतो; पण त्यांच्या विचारा-आचारांचा 'मेळ' नसावा असे वाटते. कारण मी त्यांच्या घरी गेलेला आहे. माझ्यापेक्षा वयाने थोडी मोठी अशी त्यांची मुलगी 'शुभा'—

—अलीकडे आमच्या घरी श्री. पां. वा. गाडगीळ, भाई र. के. खाडीलकर, भाई एस. एम. जोशी, आणि आचार्य जावडेकर इत्यादी माणसे नेहमी येताना दिसतात; पण प्रांजळपणाने सांगायचे झाले तर त्यांतील फक्त आचार्य जावडेकरांबद्दल आम्हांस आदर वाटतो.

श्री. पां. वा. गाडगीळ हे तर इतक्या मोकळ्या मनाने आणि मोठ-

मोठ्यांदा पण खऱ्या जिव्हाळ्याने बोलत असतात,-नाटकी सभ्यपणा तर त्यांच्यात अजीबात दिसत नाही. त्यामुळे होतें काय की, श्री. पां. वा.



लेखकाच्या मांडीवर प्रस्तावना लेखक

गाडगीळ यांची विद्वत्ता आणि वय सोडल्यास ते स्वभावाने अद्याप आमच्याइतकेच लहान आहेत असे आम्हांस वाटते. आमच्या बालवया-

मुळें आमचे रागलोभ जसे लपत नाहीत अगदी तसे या गृहस्थाचे आहे ! मनुष्य फारच साधा आणि सरळ.

या लोकांमुळे आमच्या ती. भाऊंस 'समाजसत्तावाद-विश्वकुटुंबवाद-व्यक्तिस्वातंत्र्य' इत्यादी गोष्टींचा अलीकडे अत्यंत आवडीने नाद लागलेला दिसतो ! पण ते विचार आमच्या ती. भाऊंच्या आणि वर उल्लेखिलेले श्री. गोरे, खाडीलकर, गाडगीळ, एस्. एम्. जोशी यांच्या कृतीत केव्हा उतरणार ते एक परमेश्वरच जाणे !

श्री. गोरे हे आपल्या कन्येस ( चि. शुभा ) घरात बिलकूल इकडे तिकडे हात लावू देत नाहीत-कागद उडवू देत नाहीत-श्री. पां. वा. गाडगीळ हे आपले मुलगे घेऊनही आमच्याकडे दोनतीनदा आले होते. तेव्हा त्यांचाही आपल्या मुलांवर जरा वचकच दिसला-कुठे गेले हो मग या लोकांचे व्यक्तिस्वातंत्र्य ?

'सर्वांस सारखी संधी' म्हणजे समाजसत्तावाद ना ? मग मी ती. भाऊंनाच प्रश्न विचारतो-आपण इतक्या लोकांचे स्नेही आहांत-आपणांस कित्येकांबद्दल आदर आहे-आपण त्या त्या सर्व लोकांच्या मुलाखती घेणार आहांत काय ? श्री. र. गो. सरदेसाई, बावडेकर, कवठेकर, गु. बापूसाहेब किकर, गोपीनाथ तळवलकर; क्षीरसागर मास्तर, पां. गो. लोहेकरे, ग. खं. पवार यांचे काय करणार तुम्ही ? इतर सर्व सोडा-पण निदान श्री. पां. वा. गाडगीळ यांचा तुमचा तर इतका स्नेहसंबंध आहे, मग त्यांची मुलाखत अद्याप का आली नाही हो ?-द्या पाहू याचे उत्तर !

आणि म्हणूनच आम्हांस आचार्य जावडेकरांबद्दल आदर आहे. त्यांची धीरगंभीर मूर्ती पाहूनच आम्हांस त्यांच्याबद्दल आदर वाटतो. "अध्यात्म-

धर्म, अर्थ, काम, मोक्ष"-त्यांच्या विचारांना विसाव्याचे क्षितिज आहे ! आणि आम्ही स्पष्ट म्हणतो की, या बाकीच्या सर्व लोकांजवळ विद्वत्ता असेल, तळमळ असेल, राजकीय चळवळही असेल-पण सगळे वारेमाप !

श्री. के. नारायण काळे या गृहस्थांबद्दल आम्हांस काही अंदाजच लागत नाही. हा गृहस्थ आमच्याकडे येताना आणि जाताना आम्ही नेहमी पाहातो; पण "जाताना येताना" तो सारखाच दिसतो. जसा काही एखादा 'पुतळाच' आला आणि गेला ! हा गृहस्थ म्हणे सिनेमा-दिग्दर्शक आहे !

आणि सिनेमा-दिग्दर्शकाबद्दल ती. भाऊंस येवढा अनादर असताना ते या गृहस्थास-श्री. के. नारायण काळे यांस-आमच्या घरी येऊच कसे देतात, याचे आम्हांला आश्चर्य वाटते ! या गृहस्थाबद्दल आदर बाळगल्यास तो कदाचित् आम्हांस सिनेमात काम करायला लावून आमचा "बालनट" करून टाकील अशी आम्हांस धास्ती वाटते. ( ती. भाऊ आमचे संरक्षण करोत ! )-आणि त्यांच्या चेहऱ्याच्या निर्विकल्पपणावरून हा गृहस्थ आम्हांला कधी 'सिनेमा' दाखवील अशी अस्पष्टही आशा वाटत नाही ! ( मी त्यांच्या घरी जाऊन एकदा त्यांच्या मुलांना तरी सिनेमा पाहायला मिळतो की नाही, येवढी चौकशी करून येणार आहे ! ) जाऊ द्या. आमच्यासारख्यांनी त्या विषयाबद्दल जास्त न लिहिणेच बरे.

श्री. निरंतर हा गृहस्थ मला बरा वाटतो. तो आमच्या घरी आमचा "सख्खा काका" असल्याप्रमाणे नेहमी येतो. आपल्या जवळच्या रिकाम्या सिगारेटच्या पेट्या आम्हांस खेळायला देतो. त्यांत असलेला चांदीचा

कागद-तो हल्ली आम्हांस मिळत नाही. त्यावरून कोठेतरी "महायुद्ध" भडकले आहे हे आम्हांस कळले आणि आनंद वाटला.

कारण येवढे महायुद्ध म्हटल्यानंतर त्यात कोणाचा तरी हमखास मोठा विजय होणार या कल्पनेचेच आम्हांस खूप कौतुक वाटते! श्री. निरंतर यांचा शालेय जगाशी संबंध असल्यामुळे व आमचाही पुढे लौकरच येणार असल्यामुळे आम्ही श्री. निरंतरांविषयी, पुढे आम्हांस त्रास पडू नये म्हणून, आगाऊच आदर बाळगून आहोत!

प्रसिद्ध झालेल्या "अनौपचारिक मुलाखती" पैकी आता फक्त एकाच मुलाखतीचा परामर्श घ्यावयाचा राहिला. ती मुलाखत म्हणजे "गोंधळेकर गोडबोले" ही जोड मुलाखत होय!

पैकी श्री. गोंधळेकर यांच्याबद्दल आम्ही काहीच लिहीत नाही. कारण आम्ही त्यांस पाहिलेलेही नाही. पण फोटोग्राफर श्री. केशवराव गोडबोले हा मात्र फार चांगला माणूस आहे, अशी आमची खात्री आहे.

आतापर्यंतच त्यांनी आमचे जवळजवळ चारपांच फोटो काढले आहेत, आणि यापुढे ते आणखी किती काढतील या कल्पनेच्या आनंदातिरेकामुळे आम्हांस अंदाजच लागत नाही. पण त्यांचा फोटोग्राफीचा धंदा मात्र वाढत्या प्रमाणात आणि जोरात चालावा-माझ्या ह्या प्रस्तावनेच्या वाचक वर्गानेही त्यांच्याकडेच आपले फोटो काढून घ्यावेत, अशी मी त्यांना आणि परमेश्वराला विनंती करीत आहे. कारण आमचे ती. भाऊ आमच्या काढलेल्या फोटोबद्दल त्यांस पैसे देत असतील असे, का कोणास ठाऊक, आम्हांस वाटत नाही!

असो, आमच्या वयानुरूप आम्ही प्रसिद्ध झालेल्या मुलाखतींचा, न

वाचतांही, इतका उत्कृष्ट परामर्श घेतला. यापुढे आणखीही काही अनौपचारिक मुलाखती येणार आहेत. त्यांत आमच्या कानांवर आलेली काही नावे म्हणजे श्री. तात्यासाहेब केळकर, प्रा. दत्तोपंत पोतदार, काकासाहेब लिमये, रावसाहेब र. लु. जोशी इत्यादी आहेत. त्या मुलाखती एक तर फार चांगल्या होतील किंवा-पण आपण आताच कशाला अंदाज जाहीर करा-श्रीसमर्थ काळच काय ते ठरविणार आहे !

तेव्हा "होमकुंड" कादंबरीप्रमाणे व इतर एकदोन हस्तलिखित कादंबऱ्यांप्रमाणे या अनौपचारिक मुलाखतीचे लेखन अर्धवट न सोडता ते ती. भाऊंनी पुरे करावे व या अनौपचारिक मुलाखतींच्या वाचनाने महाराष्ट्रासकट हिंदुस्थान स्वराज्यसन्मुख व्हावा ! मुसलमान बंधूंनीही पाकिस्तानाची संकुचित आणि अराष्ट्रीय कल्पना सोडून द्यावी-मग हिंदुमहासभेचीही चळवळ आपोआपच थंडावेल ! आणि येवढे झाल्यानंतर रशिया व जर्मनी यांचाही आंतरराष्ट्रीय तह होण्यास अडचण पडणार नाही हे निश्चित ! आणि आपल्या एकाच पुस्तकाने एवढे 'राष्ट्रकार्य' केल्यानंतर ती. भाऊंनीही आपले लेखन पुढे सोडून द्यावे अशी आम्ही त्यांस अत्यंत लडिवाळपणाची पण नम्र विनंती करणार आहो !

आता फक्त एकदोन गोष्टींचा खुलासा करून ही प्रस्तावना संपवणार !

मराठी वाङ्मयात एका नवीन प्रकारची भर घालण्याकरिता ह्या मुलाखती आपण लिहिल्या असे कदाचित् ती. भाऊ कौतुकाने सांगण्याचा संभव आहे. तेव्हा त्यांची अगोदरच नाकेबंदी करण्याच्या हेतूने आम्ही एक आगाऊच खुलासा करून ठेवतो.

या मुलाखती का लिहिल्या गेल्या ?

आमच्या ती. भाऊंचा स्वतःचाच प्रकाशनाचा घरचाच धंदा असल्या मुळे ते बहुतेक नेहमी घरीच असतात ! तेव्हा आम्हांस संभाळण्याची त्यांच्यावर वारंवार जबाबदारो पडते. घरातील आमची वडीलधारी माणसे ती. भाऊंच्या फक्त एकाच सबबीला दचकतात ! आणि ती जालीम सबब म्हणजे "मला आता लिहावयाचे आहे !"

तेव्हा ज्या ज्या वेळी 'बापूला–म्हणजे मला–थोडे सांभाळा !' असा ती. भाऊंना घरातून हुकूम सुटतो, त्या त्या वेळी गेल्या वर्षभरात ती. भाऊंनी "मला लिहावयाचे आहे !" अशी सबब सांगून ती वेळ काढण्याकरिता मग जे काही ते लिहीत बसले त्या सर्व या 'अनौपचारिक मुलाखती' होत !

ह्या लिहिण्यात "मराठी वाङ्मयाचा" काहीही संबंध नसून, आम्हांस संभाळण्याचे कर्तव्य टाळणे हाच त्यातील सद्हेतू होता. असो.

ही प्रस्तावना संपवताना एक विचार मात्र आमच्या मनाला धक्का देतो. तो विचार म्हणजे–या अनौपचारिक मुलाखती लिहून आणि आणखीही पुढील मुलाखती लिहून आणि पुढे यांचं स्वतंत्र पुस्तक काढून ती. भाऊ यांनी जे कागद खराब केले आणि पुढे करणार ते तसे न करता जर त्यांनी वाचविले तर ते आम्हांस पुढे अभ्यासाला उपयोगी पडणार नाहीत काय ? पण आम्हांसही हल्ली राहवत नसल्यामुळे आम्ही हाती लागतील ते कागद जर फाडतो, तर–तेव्हा अशा तऱ्हेने आमचीच बाजू लंगडी असल्यामुळे, हा विचार ती. भाऊंस तरी आम्ही कसा सुचवावा ?

यावरून वाङ्मय आणि चारित्र्य यांचा किती घनिष्ट संबंध आहे हे आपोआपच सिद्ध होते ।

आता फक्त शेवटच्या एका महत्त्वाच्या मुद्द्याचा विचार करावयाचा राहिला.

या 'अनौपचारिक मुलाखती' पुरोगामी आहेत की 'प्रतिगामी' आहेत ?

आमचे प्रांजळ मत असे आहे की, आज ह्या मुलाखती निःसंशय 'पुरोगामी' आहेत !

पण पुढे कदाचित् आम्ही वयात येऊन 'लेखकच' झालो, तर आमच्या वडिलांची पेन्शनीत गेलेली जुनी पिढी ठरणार–आणि मग ओघानेच ती. भाऊंचे वाङ्मय आणि या मुलाखतीसुद्धा 'प्रतिगामी' ठरणार !

पण आम्ही जर लेखक न होता 'क्रिकेटपटू' झालो आणि तोच आमचा विचार अखेर कायम ठरेल असे आम्हांस आज वाटते, तर आमच्या ती. भाऊंचे वाङ्मय निःसंशय 'अजरामर' व 'पुरोगामी' ठरणार ! आणि आज आमचे ती. भाऊंवर येवढे प्रेम आहे की, त्या प्रेमाकरिता आणि त्यांचे वाङ्मय 'पुरोगामी' ठरावे येवढ्याकारिता आम्ही 'लेखना' कडे न वळण्याचा स्वार्थत्याग करण्याचे मनात आणीत आहोत.

येथपर्यंत प्रभुकृपेने आम्ही आमच्या वडिलांनी लिहिलेल्या 'अनौपचारिक मुलाखती' बद्दल तार्किक आणि मार्मिक पद्धतीने, सात्त्विक आणि तात्त्विक पद्धतीने लिहून "जीवन-कलेच्या" जोडशक्तीने परामर्श किंवा भरपूर खरपूस समाचार घेतला आहे. हे येथे येवढ्याकरिताच सांगितले की, आम्ही तसे केले नाही अशी–केवळ आम्ही न सांगितल्यामुळे–कोणास शंका येऊ नये !

—ओ ऽ हो ! ती पाहा कोणी तरी 'चंद्रज्योत' पेटविली वाटतं !

—मग आमच्या प्रस्तावनेचेही "हेडिंग" आता चंद्रज्योतच !-

—वाहवा ! बेबी-शांती-गोद्या-अन्त्या-अंद्या सर्वंजणच फुलबाज्या आणि फटाकडे उडवावयाला लागले वाटते—आता आम्हांला कोठला धीर निघावयाला—आता हे वाङ्मयकार्य येथेंच संपवून जाता जाता-पुनः केव्हा तरी-"दिवाळीतील शोभेची दारू-आणि मराठी ललित वाङ्मय" यांचा किती घनिष्ठ सबंध आहे—

– अरे बाप रे, काय चंद्रज्योतीचा नयनरम्य प्रकाश हा !

– या फुलबाज्यांतून काय तेजदार ठिणग्या टपटप खाली पडत आहेत !

– जशा काही मराठी वाङ्मयात कोट्याच निथळत आहेत !

वाहवा ऽ वाहवा ऽ ! चेंडू ऽ हा ऽ ऽ ऽ !

सुंदर किती तरो खचित हा !-

हा आला ऽ ऽ —

—मराठी वाङ्मयात इतक्या लहानपणी प्रस्तावना लिहिणारा पहिलाच

**मनोहर यशवंत जोशी**

—नमस्ते ! – वंदे मातरम् !

* * *

## रावसाहेब गोपाळ लक्ष्मण आपटे : : : २

त्या दिवशी मी जेव्हा घरी परत आलो, तेव्हा माझे मलाच आश्चर्य वाटले. वास्तविक मी कोठे तरी चहा घेण्याकरिता म्हणून बाहेर पडलो होतो. आणि परत आलो तो एक मुलाखत घेऊन! त्या दिवशी मी दोन-चार स्नेह्यांकडे गेलो; पण घरी कोणीच भेटले नाही, म्हणून सहज परत येताना एका घराशी थांबलो. आणि—

"काय साहित्यिक आहेत का?" या प्रश्नाने मी त्या घरातील व्यक्तीला हटकले.

—आता मला वाटते वाचकांनी ओळखले असेलच की मी ज्या व्यक्तीला हटकले ती व्यक्ती म्हणजेच पोलिस प्रॉसिक्यूटर रावसाहेब गोपाळ लक्ष्मण आपटे होत.

"काय साहित्यिक आहेत का?" मी पुनः पुकारले.

इतक्यात एक रुबाबदार माणूस तिरमिरीने दाराबाहेर आला आणि त्याने काहीसे रागात आणि पुष्कळसे लोभात म्हटले,

"सकाळच्या प्रहरी अनपेक्षित आलात आणि शिवीने का हाक मारतोस मला ? प्रभाते मुखी राम चिंतीत जावा !'

कानावरून जाणाऱ्या वाऱ्याप्रमाणेच मी त्या उद्गाराला किंमत दिली. आणि सदर घरात शिरत म्हटले, "काही कामात नाहीना ?"

"मी खूप कामात असेन–पण आपण आलां–आता काय काम व्हायचं आहे ?–बरं, ते जाऊ द्या-आज केवळ तुमच्या आमच्या लोभाखातर "साहित्यिक" ही शिवी ऐकून घेतली–पण आपण पुढे या बाबतीत खबरदारी घ्याल, अशी मी आशा करतो !"

"अहो सभ्य, हा सोवळेपणा फार झाला–पण मी काय दाद देणार आहे तुम्हांला ? अरे गृहस्था, मी तुची दोन पुस्तकं छापली आहेत-† 'आपट्याची पाने' आणि '*विचित्र वाटमारी'–आणि आता कितीही दम दिला तरी तुम्हांला साहित्यिक म्हणायला सोडतो होय मी ?"

तसा मला साहित्याचा पडस, खोकला येतो मधून मधून ! पण म्हणून साहित्याचा आजन्म दमेकरी म्हणवून घ्यायची आपली तयारी नाही! मनुष्य आहे, करतो एखाद्या वेळी कविता-" गोपाळराव आपली बाजू मांडीत होते.

---

† कवितासंग्रह

* विचित्र वाटमारी : विनोदी आणि गंभीर गोष्टींचा संग्रह.

प्रकाशक-अर्थात् य. गो. जोशी ६२३।१५ (नवा १८९२) सदाशिव, पुणें २.(३०)

"पण गोपाळराव, तुम्ही कविता जरी थोड्या आणि मधून मधून करीत असला, तरी तुमच्या कविता खऱ्याच उपहासगर्भ आणि सुंदर असतात–"

"पण यशवंतराव, माझ्या कविता चांगल्या असतात हे माझ्या "आपटयाची पाने" या कवितासंग्रहाच्या खपावरूनच नाही का ठरलं?-अहो, मराठीत कोणतं चांगलं पुस्तक जास्त खपतं? अन् आज अगदी सकाळच्या प्रहरी माझ्या कवितांची इतकी स्तुती चालविली आहेत, पण याद राखा, माझ्या कवितांचे आणखी एखादं पुस्तक प्रकाशनार्थं गळ्यात मारीन तुमच्या-हा धोका लक्षांत आणून बेताचीच स्तुती करा म्हणतो मी!"

"बरं, आज खरं सांगायचं म्हणजे मी तुमच्याकडे चहाकरिता आलो आहे!"

गोपाळराव थट्टेत हसत म्हणाले "ठीक आहे, चहा देतो-पण बिझिनेस बोला–चहाच्या बदला मी पुढे जर आणखी एखादे पुस्तक काढले तर त्याला प्रस्तावना लिहाल काय?"

मी त्या प्रश्नाला बगल देण्याच्या हेतूने म्हटले, "प्रस्तावनेचं जाऊ द्या हो, पण मी आज मुलाखतच घेतो तुमची! अद्याप त्या प्रांतात तुमची शिकार झालेली नाहीना?"

"नो, नो! अजूनपर्यंत माझ्यावर तो प्रसंगच आलेला नाही! बरं मग, मुलाखतीचे नक्की ठरले काय?–मग नुसता चहा कसा चालेल?" गोपाळराव सचिंतपणाने म्हणाले.

"बरं, मग कॉफी सांगा!" मी निष्काळजीपणाने म्हटले.

"नाही, कोको सांगतो!" गोपाळराव बेफामपणाने म्हणाले.

नाही, मग मसाल्याचे दूध सांगा !"

"बरं, त्याच्याबरोबर काही बिस्किटे वगैरे ?"

"मी तुमच्या मुलाखतीला जितकं महत्व द्यावं असं तुम्हांला वाटत असेल, त्या मानाने तुमचे तुम्हीच ठरवा काय ते !" मी आपला निःस्पृह-पणा दाखवीत म्हटले.

"मग, मी म्हणतो, यशवंतराव, जेवायलाच राहता आज आम-च्याकडे ?" नंतर अनुक्रमाने मसाल्याचे दूध; कॉफी, कोको, दोन वेळ चहा—आणि या सर्व पेयांची पोटात सरमिसळ होऊ नये म्हणून प्रत्येक पेयामध्ये, खारका, बदाम, मोसंबी, संत्री वगैरे झाले. त्या वेळी एकमेकांशी एका शब्दानेही आम्ही बोललो नाही–वातावरण अगदी 'गभीर' होते.

नंतर सुमारे दीड एक तासाने मी तेथून बाहेर पडलो.

श्री. गोपाळराव यांनी मला उंबरठा ओलांडीपर्यंत शांतपणाने जाऊ दिले–पण नंतर मात्र लगेच त्यांनी घाईने माझ्या कोटाचा कोपरा पक-डला, आणि म्हटले, "–अहो साहित्यिक-चहा-केळी-कोको–ठीक आहे–पण आमच्या मुलाखतीचे काय ?"

मी गंभीरपणाने म्हटले, 'पाहू पुनः एखाद्या वेळी–आता उशीर नाही का झाला ?

"अरे साहित्यिका–" गोपाळराव दातओठ खात म्हणाले, "–आता पुढे पाहू काय ? मी पोलिस प्रॉसिक्युटर आहे लक्षात आहेना ? आणि आपल्या सायकलला तर दिवा कधीच नसतो–एखाद्या दिवशी सापडला, म्हणजे याल वशिले लावायला ! तेव्हा काढीन या चहा-केळयांचा वचपा !'

मीही सदरा झाडीत म्हटले, "बरं बरं–दम नका देऊ ! आता घेतो

मुलाखत-हं, आता मात्र उशीर करू नका हं-हं मुलाखतीला बसल्यासारखे नीट बसा पाहू-"

इतक्यात कोणी तरी कोर्टातला माणूस गोपाळरावांच्याकडे आला, आणि, त्याने हाक मारली-" रावसाहेब !"

त्या माणसाचे काम झाले आणि तो निघून गेला.

मी मुलाखतीला सुरुवात केली.

"आपण रावसाहेब केव्हापासून झालां ?"

"तुम्ही 'प्रथितयश' आणि ख्यातनाम' साहित्यिक झाला त्याच वेळेपासून ! आम्ही या तुमच्या पदव्यांबद्दल कधी शंका घेतली आहे काय !-मग आमची तसलीच रावसाहेबी आपल्या डोळ्यांत का सलते ?"

आता त्या मुद्यावर बोलणे वाढवणे मला शक्य नसल्यामुळे मी दिवाण-खान्यात चौफेर पाहात म्हटले, "बाकी गोपाळराव, तुमची टेस्ट चांगली दिसते ! हे टेबल, हे फर्निचर, हा रेडिओ -"

असणारच ! आम्ही तरी काय करणार त्याला ? आमच्या वडिलांनी आमच्याकरिता येवढा पैसा मिळवून ठेवला-आणि त्याच्या मोबदल्यात आम्ही आपली टेस्टसुद्धा चांगली ठेवू नये काय ?"

'टेस्ट'चाही मुद्दा बिनतोड निघाल्यामुळे मला पुनः वाकडी वाट करून निराळा प्रश्न विचारावा लागला.

"बरं, आपण सकाळी केव्हा उठता ?

"झोप झाली की !" गोपाळराव ताडकन् म्हणाले. "एकदा झोप झाली आणि नंतर अंथरुणावर लोळून कंटाळलो की आपल्याला उठल्या-शिवाय राहावतच नाही बघा !-"

"अरे वा: !" मी मनातल्या मनात म्हटले, "अगदी माझ्यासारखेच की !" आणि पुन: मुलाखतीला सुरुवात केली. "आपण आपल्या शरीरा-बद्दल खूप मेहनत घेतलेली दिसते आहे–आपल्या व्यायामाचा काही स्पेशल प्रकार आहे काय ?"

"मुलाखतीत तरी निदान तो नवीन वाटेल अशी आशा आहे !" गोपाळराव आपल्या वैशिष्ट्याच्या तद्रूपतेत म्हणाले. "लहानपणी शाळा सुटली की पाटीदप्तर घरात कोठेतरी भिरकावून आम्ही जे घराबाहेर पडायचे ते दोन-तीन तासपर्यंत चिंचा, आवळे पाडीत हिंडायचे–आणि मग घरी आलो की आमच्या वडिलांनी आम्हांला खूप चोपायचे—त्यामुळे आम्हांला व्यायाम असा निराळा करावाच लागला नाही !" आपला पिळदार दंड माझ्यापुढे करीत गोपाळराव स्वाभिमानाने आपल्या लहान-पणाच्या आठवणीने गहिवरून म्हणाले, "–अहो, मग शरीर तयार न व्हायला काय झाले ? अलीकडे तो व्यायाम आमचा सुटला आहे ! पण काय सांगू, यशवंतराव तुम्हांला, अद्यापपर्यंत मी पेरू चिरून खाल्याचे मला कधी आठवत नाही ! सबंध पेरू–दोन घास–आणि वर फार तर एक चिमूटभर मीठ त्या पेरूला लागावं म्हणून नंतर तोंडात टाकायचं ! चिंचा-चिंचा तर काही विचारूच नका, बघा ! चिंचेच्या दिवसांत माझ्या खिशात एक वेळ पेन्सिल सापडायची नाही–पण चिंचाचीं एकदोन बुटकं हमखास सापडायची ! यशवंतराव, तुम्हाला कदाचित् माहीत नसेल, चिंचांत दोन जाती आहेत-तांबड्या चिंचा आणि साध्या चिंचा ! आणि त्यातल्या त्यात गाभुळलेल्या चिंचा खायला–वा: ! वा: ! आता पोलिस प्रॉसिक्युटर झालो आहेना-तरी एखाद्या वेळी वाटते, ही नोकरी सोडावी आणि आवळे–चिंचा पाडीत हिंडावे !"

"बरं, आपला शाळेत अभ्यास वगैरे ?"

खरं सांगू, यशवंतराव," गोपाळराव आपला आलेला गहिवर पुशीत म्हणाले, "मी अभ्यास असा मन लावून केलेला कधी आठवतच नाही मला; पण परीक्षेत आपला नेमाने पास व्हायचा ! त्यामुळे आमच्या वडिलांना आश्चर्यंही वाटायचे !–आणि शंकाही यायची ! पण वडिलांच्या नंतर लक्षात आले की लक्षात राहणं हा आमच्या बुद्धीचाच धर्म आहे !- तेव्हा मी परीक्षेत पास होतो त्यास माझा नाइलाज आहे ! आता स्पष्ट सांगतो तुम्हाला, यशवंतराव, मुलाखतीत म्हणून आमच्या आयुष्याला तुम्ही कर्तबगारी कोठेही चिकटवा–आमची काही हरकत नाही त्याला– पण स्पष्ट सांगायचे तर आमच्या आयुष्यात गोष्टी होत गेल्या–आम्ही त्याला अटकाव केला नाही हा आमचा फार तर चांगुलपणा !"

मला गोपाळरावांचे म्हणणे बरेचसे पटले.पुष्कळ माणसांना परिस्थिती-मुळे कर्तबगार व्हावेच लागते ! परिस्थितीपुढे ते तरी काय करणार बिचारे ?—पण नंतर लगेच मी सहानुभूतीने गोपाळाला विचारले—

"बर, आपण वकिली सोडून नोकरीशी पत्करली ?"

मोठ्यांदा मनमोकळेपणाने हसत गोपाळराव म्हणाले, "याचं कारण अगदी उघडच आहे की !"

"बरं, वकिलीच्या धंद्यासंबंधाने आपलं मत काय आहे ?"

"वकिलीपेक्षा पोलिस प्रॉसिक्युटरची नोकरी बरी ! आणि दिवस-मानाने बेकारीपेक्षा वकिली बरी !"

"मग आपण आपल्या वकीलमित्रांना हे आपले विचार कधी सांगता का ?" मी हळुवारपणाने विचारले.

"अहो, हरहमेश सांगतो ! आणि त्यांतील कित्येकांना ते मनापासून पटलेही आहे ! पण ते माझ्या लक्षांत येताच मोच धसका घेतला. कारण माझ्यासारखं त्यांचं जमायचं, म्हणजे माझं काही तरी बरंवाईट व्हायला पाहिजे किंवा मी नोकरीचा राजिनामा तरी द्यायला पाहिजे ! तेव्हा मीच हल्ली उलटी ओरड करतो की—या नोकरीत काय जबाबदारी—काय त्रास—काय मेहनत—काय हुषारी—काय जबरदस्त—आता आणखी काही आठवत नाही, बघा;—पण खरं बोलायचं, यशवंतराव, म्हणजे कोणतीही नोकरी म्हटली—मग ती पट्टेवाल्याची का असेना—कमी अधिक प्रमाणात त्यात हे सर्व असतंच की—"

"बरं, उद्योग, उत्साह, राष्ट्रसेवा वगैरेबद्दल आपलं काय मत आहे ?"

"ते सर्वं शब्द अद्याप सुखरूप आहेत की ! त्यांचं काय व्हायच ? मला वाटतं, बरं चाललं आहे त्यांचंसुद्धा !

"बरं, आपल्या लहानपणाच्या काही आठवणी सांगतां येतील का ?"

"हो ! त्याच फार आहेत आमच्या आयुष्यात ! आणि लहानपणाच्या आठवणींकडे डोकावून पाहावयालाही खूप गंमत वाटते बघा. अगदी लहानपणाची आठवण सांगतो हं, तुम्हाला. आमच्या शेजारी एक कुत्रा होता. आम्ही त्याचे खूप हाल करायचे—आणि मग पुढे त्या कुत्र्यानेही माझे खूप हाल केले. मी शाळेत जायचा—तो—तो कुत्रा आपला थेट माझ्या मागोमाग-अगदी वर्गात-मग तेवढंच निमित्त करून मी शाळा चुकवू लागलो-आणि हुजुरपागेसमोर ते स्टेशनरी सामानाच दुकान आहे ना-तेथे वेळ काढायचा शाळेतला !" गोपाळराव आपल्या लहानपणाच्या आठवणींत अगदी रंगले होते.

"पण मग शाळेचं प्रगतिपुस्तक आपल्या वडिलांनी पाहिल्यानंतर ते रागावत नसत का आपल्यावर शाळेतल्या गैरहजेरीबद्दल ?"

"पण प्रगतिपुस्तक त्यांना पाहावयाला मिळेल तेव्हा ना ! अहो, तो स्टेशनरी सामानाचा दुकानदारच आमचं हिरमुसलं तोंड पाहून आमच्या प्रगतिपुस्तकावर पालक म्हणून सही करायचा ! वास्तविक त्याच वेळेला मला कळायला पाहिजे होतं की मी पोलिस प्रॉसिक्युटर होणार म्हणून: पण खरं सांगू, यशवंतराव, मला जर अगोदर कळतंना की मी पुढे पोलिस प्रॉसिक्युटर होणार आहे म्हणून, तर खचित सांगतो, तुम्हांला. मी लहानपणीं असे वागलो नसतो ! अहो, हल्ली एखाद्या वेळी मी पटकन् दचकून जागा होतो–वाटतं, जर चुकून आपली मुलाखत घ्यायला कोणी आला—आणि आपण हे सगळं खरं खरं सांगितलं—तर कोण काय म्हणतील ?"

"बरं, ते जाऊ द्या !" मी म्हटलं, "आपल्या जीविताला काही तत्त्वज्ञान ? ध्येय ?"

गोपाळराव उसळीने म्हणाले, "नसून कसं चालेल ? माझं तर अगदी असं स्पष्ट मत आहे की, कोटाला जसा बटन आवश्यक तसं प्रत्येक जीवाला काही तरी तत्त्वज्ञान आणि ध्येय पाहिजेच ! अहो, ते जर नसलं —तर मुलाखतच अशक्य की ! तेव्हा मी ठरवलं आहे की होता होईल तो बरं वागायचं ! चार स्नेहीसोबती गोळा करून नोकरीशिवाय राहिलेला वेळ खेळून काढायचा ! आपल्या पुण्याच्या सोशल क्लबातील नाटकांतही मी नेहमी काम करतो—परवाच्या आमच्या खेळाला मी आपल्याला चार कॉम्प्लिमेंटरी पास पाठवले होते—लक्षात असेलच तुमच्या—अन् मग तुम्ही माझ्या कामाची खूप स्तुती करीत होता—

तेव्हां सांगायचं काय, मी नाटकांत मधून मधून काम करतो ! लोकांचं चांगलं करतां आलं नाही तरी निदान लोकांना आपल्यापासून त्रास होऊ नये–हे ध्येय त्यांतलं. म्हणून मी आपला खेळात गुंगत असतो. कसं काय, आमच्या ध्येयाबद्दल काय मत आहे तुमचं ?"

गोपाळराव आता अगदी रंगात आले होते. पण मी त्यांना सावध केले, "गोपाळराव ही मुलाखत तुमची आहे-त्यात माझी मतं कशी चालतील ? बरं, ते जाऊ द्या, एकंदरीत आपलं आयुष्य सुखी आहे ना ?"

"ओ येस् ! अलबत !–मग काय, चहा सांगू की काय पुन्हां ?"

"हं, सांगा." मी प्रसंगाला तोंड देत म्हटले. गोपाळराव चहा सांगायला खाली गेले आणि ते परत येतात तोच मी त्यांना प्रश्न टाकला, "बरं, जगाबद्दल आपलं मत काय आहे ?"

"ठीक आहे की ! जगाचं काय आहे ? असंच चालत राहणार ! मला वाटतं जगाचंही बरं चाललं आहे ! का तुम्हाला काही तरी नवीन माहितो मिळणार या अपेक्षेने गोपाळराव बोलत होते. पण मी त्यांना निराळ च प्रश्न टाकला.

"बरं, आपले आवडते ग्रंथकार ?"

मिष्किलपणाने हसत गोपाळराव म्हले, "सांगूच का ?"

"हं, सांगा ना. तुम्हाला कुणाचं वाङ्मय आवडतं ?"

"मराठीत अव्वल दर्जाचे दोनच लेखक आहेत."

"कोण कोण बुबा ?"

"एक तुम्ही आणि दुसरा मो !"

"काय म्हणता ?"

"अहो अगदी खरं ! हे मतही परिस्थितीवर अवलंबून आहे ! आता असं पाहा—या वेळेला मराठीत अव्वल दर्जाचे लेखक दोन; पण कल्पना करा—आता तुम्ही घरी गेलात आणि मी आपल्या दिवाणखान्यात एकटाच राहिलो—आणि माझी पुस्तकं माझ्या हाताशी आली—तर त्या वेळी मराठीत अव्वल दर्जाचा लेखक एकच असणार यात काही शंका यायला तरी जागा आहे का ?"

"बरं, तुम्हांला चित्रपट कोणचे आवडतात ?"

"जो नवीन असतो तो ! जुने चित्रपट कसे चांगले वाटणार मला ? नवीन चित्रपटांतही एक गंमत होते-काही पाहण्यापूर्वी चांगले वाटतात ! —काही पाहिल्यानंतर चांगले वाटतात, उहाहरणार्थं, 'माझा मुलगा !-'"

ते ऐकताच मला एकदम घाई झाली. "बरं गोपाळराव, आपण बी. ए, एलएल. बी. झालेले आहांत; तेव्हा आपण कॉलेजमध्ये गेले असालच असे मी गृहित धरतो. तेव्हा तिथे काही प्रेम वगैरे ?"

"आमचे वडील !—" गोपाळरावानी एक केवढा थोरला सुस्कारा टाकला.

"बरं बरं—" मी आनंदाने म्हणालो. आता काही तरी जुन्या पिढीबद्दल विचारप्रवर्तक ऐकायला मिळणार या आशेने मी तरारलो. "हं, आपले वडील ! पुढे काय !"

"काही नाही—त्यांनी आमची नाकेबंदी केली !"

खोटं काही तरी ! प्रेमाची नाकेबंदी कशी होणार ?

"प्रेम करण्यासारखं आमचं वय झालं—आणि वडिलांनीं लगेच आमचं लग्न करून टाकलं—"नंतर थोडेसे शरमून गोपाळराव म्हणाले,

"आणि कबूल करायला लाज वाटते जोशीबुवा, लग्न झाल्यानंतर प्रेमाच्या फंदात पडायला लागणारं 'मॉरल करेज' आमच्याजवळ नाही, पण त्याचा सूड म्हणून मी एक करायचं ठरवलं आहे !"

"काय ?" मी ताडकन् उठून उभा राहिलो.

"मी आपल्या मुलाचं लग्न त्याचं शिक्षण पुरे झाल्याशिवाय करणार नाही !"

नंतर मी गोपाळरावांना नमस्कार करीत म्हटले. "बरं, जातो आता मी. मी काही मुलाखत घ्यायच्या हेतूनं आलो नव्हतो-तेव्हा मुलाखतीला आवश्यक असे काही प्रश्न माझ्याकडून निसटले असतील तर माफ करा मला. बरं, आता महत्त्वाचं असं काही तुमचं सांगायचं राहिलं आहे का ?"

"आता उशीर फार झाला आहे'—यापेक्षा जास्त काय सांगणार ?

ते महत्त्वाचे वाक्य लक्षात घेऊन मी उठलो.

"अशा मुलाखती आपण आणखी काही घेणार आहात काय ?"

"का ? आपल्याला कुणाचं नाव सुचवायचं आहे ? सुचत असलं तर सांगा. जमलं तर केव्हा तरी त्यांच्याकडे दूध, केळी, चहा वगैरे !"

नंतर गोपाळरावांनी त्या व्यक्तीचे नाव माझ्या कानात सांगितले. "हं—त्यालाही आणा की जरा पुढं !"

"ठीक आहे, पाहतो प्रयत्न करून !"

"बरं, माझ्या मुलाखतीची प्रुफे धाडाल का माझ्याकडे !—म्हणजे मला सुचलं तर मीही काही फेरबदल करीन त्याच्यात—"

मी मानेनेच गोपाळरावांना नकार दिला आणि सायकलवर आरूढ होऊन घरी आलो.

मुलाखत लिहून काढली.

—आणि नंतर—

गोपाळरावांनी केव्हा संधी साधली कुणाला ठाऊक ? मी घरी नसताना माझ्या टेबलावरचे मुलाखतीचे हस्तलिखित त्यांनी वाचले आणि खालील मजकूर मुलाखतीखाली लिहून ठेवला.

"मुलाखत ठीक आहे; पण लिहिण्याच्या धांदलीत फक्त एका ठिकाणी माझ्या नावाचा एकेरी उल्लेख झाला आहे. मुलाखतीत आपण फेरबदल करणे मला इष्ट वाटत नसल्यामुळे मी ही मुलाखतीच्या शेवटी टीप देत आहे. फक्त एका ठिकाणी नुसतं 'गोपाळ' लिहिलं आहे. त्याच्यापुढे वाचकांनी 'राव' असे वाचावे. मुलाखत सबंध वाचली नाही तरी चालेल, निदान नुसते 'गोपाळ' कुठे आले आहे ते पाहून त्याच्यापुढे 'राव' वाचायचे आहे, येवढं वाचकांनी कृपाळूपणे लक्षात ठेवावे."

* * *

## शांताराम आठवले : एक कवि : : : ३

गेल्या ता. ३ फेब्रुवारीची गोष्ट.

शांताराम आठवले हा माझा स्नेही आहे. वयाने तो माझ्यापेक्षा लहान आहे आणि त्याला 'अरे जारे' म्हटल्याशिवाय माझी त्याबद्दलची आपुलकीची भावना तृप्त होत नाही. मी शांताराम आठवल्याला चिठो लिहिली,

" जरा काम आहे. घरीच राहा. मी एक तासाने येत आहे ! "

अर्थात् शांताराम घरीच राहिला. आणि मी जो त्याच्याकडे चिठी-प्रमाणे जातो तो मी आश्चर्याने थक्कच झालो ! कारण शांताराम आठव-ल्याच्या टेबलावर केळी, मोसंबी पेरू यांचा ढीग पडला होता.

मला वाटले, माझी गेल्या 'सह्याद्री' च्या अंकातील रावसाहेब आपटे यांची मुलाखत या गृहस्थाने वाचलेली दिसते आहे आणि टेबलावर केळी,

पेरू, मोसंब्यांचा ढीग ठेवून हा गृहस्थ आपल्या मुलाखतीचे आवाहन करीत आहे !

—आणि मला त्यांत नवल वाटले नाही. माझ्या घरी एखादे कार्य निघाल्यानंतर आपल्या घरी 'अक्षद' येईल अशी शांतारामाने अपेक्षा केली तर त्यात चूक नव्हती; पण इतक्या लवकर अपेक्षा करणे मला थोडे घाईचे वाटले.

शांताराम आठवल्याने मी त्याच्या घरी जाताच मला 'या बसा' केले आणि माझ्याकडे किंचित् थट्टेखोरपणाने पाहत व हसत आपल्या एका हाताच्या पंजावर दुसऱ्या हाताच्या पंजाने थोडासा बायकी ठेका धरीत तो गुणगुणू लागला—

" मन शुद्ध तुझं—गोष्ट हाये—पृथीवी मोलाची !
तूं चाल पुढे, तुला रं गड्या भीति कशाची ? "

आपल्या पोराशी खेळावे इतक्या तन्मयतेने तो कवि ती कडवी म्हणत होता.

आणि—!

रस्त्यात कोणी तरी कोणाला 'आण्णासाहेब' म्हणून हाक मारावी आणि कांही तरी धुंदीत ती आपल्यालाच आहे असे आपणास वाटावे—आणि घरी मात्र आपल्याला " आण्णा " या शब्दापुढे कुणी काहीसुद्धा म्हणत नसावे--त्याप्रमाणें माझे झाले.

मला वाटले, ते काव्यचरण तो कवी माझ्या वृत्तीचे वर्णन म्हणून करीत असावा !

—हे लिहायला लाजायचे मलाही काही कारण नाही म्हणा. प्रत्येकाचे असे काही गैरसमज केव्हा तरी होतातच !

कवी गात होता. मी पाहत होती.

आणि मला वाटले, हे काव्यचरण ज्यांनी ऐकले असतील—आणि ते शांताराम आठवले या कवीचे आहत, असे ज्यांना माहीत असेल--त्यांनी जर शांताराम आठवल्याला पाहिले नसेल, आणि अशांनी जर शांताराम आठवले कसे असतील याची कल्पना केली, तर त्यांनी आणि मीसुद्धा असे वर्णन दिले असते —

'गरुडासारखे नाक, शंभर कँडल पॉवरने चमकणारे घारे आणि तीक्ष्ण डोळे — डोक्यात घोळणाऱ्या काव्यकल्पनांनी खो-खोचा किंवा हुतुतूचा डाव खेळायचे ठरविले तर त्यांना खेळायला पुरून उरेल असे भव्य कपाळ — छातीवर दगड फोडून घेण्याइतकी भयंकर भरदार छाती—चेहेऱ्यावर सदैव तळपणारे ते स्मितहास्य (रागातसुद्धा बरं का !)'

माझे मलाच हसायला आले. शांताराम आठवले याला जेव्हा मी पहिल्यांदा पाहिले—म्हणजे मला एकाने दाखविले— तेव्हा पटकन् माझ्या हातातील जळको विडी गळून पडली होती—आणि मी मनात उदगारलो होतो—

"अरे हा कसला कवी ? एक किडकिडीत माणूस ! याचे खरे वर्णन करावयाचे तर-उंचीचा शेकटा ! जाडो-रस्त्यावरच्या तारेच्या खांबाची ! डोळे मात्र काही तरी सांगणारे ! तोंडावर एक तऱ्हेचे केविलवाणे हास्य ! मनातील कल्पनांचे वारे सावरण्याकरिता नेसत्या धोतराचे शीड हातात धरून चाललेला एक माणूस !"

मी मनात तर ठरविलेच की आज या गृहस्थाची मुलाखत घ्यायची ! पण सुरुवात कशी करावी, हे माझ्या लक्षात येईना.

कवीचे गाणे चालूच होते.

अखेर शेवटी मी त्या कवीला एक चमत्कारिक प्रश्न टाकला.

'खरंच, आठवले, आपण कवी आहोत असे आपणांस केव्हापासून वाटायला लागले आणि का वाटायला लागले ?"

माझ्या या पहिल्या प्रश्नानेच शांतारामाचे गाणे बंद पडले आणि डोळे तपासण्याकरिता डॉक्टराने डोळ्यांत औषध घातले की माणसाला जशा सर्व वस्तू सारवल्यासारख्या दिसायला लागतात, त्याप्रमाणे आविर्भाव करीत, शांताराम आठवले किंचित् गोंधळलेल्या वृत्तीनेच म्हणाला–

"हा प्रश्न फार मुद्देसूद असल्यामुळे आणि त्याच्यात मनोविश्लेषण, गूढगुंजन आणि शिवाय मनोरंजन असल्यामुळे मी या प्रश्नाचे तडकाफडकी उत्तर देऊ शकत नाही !"

"ठीक आहे ! मग तितक्याच महत्वाचा मी आपणाला दुसरा प्रश्न विचारतो. आपण आपली रविवारची सुटी कशी काय घालविता ?"

"खुषीत आणि मजेत घालवितो ! प्रत्येक रविवार माझा निरनिराळा जातो. फक्त न चुकता एक गोष्ट मात्र मी नियमाने दर रविवारी करतो–"

"काय दाढी ?" मी जिज्ञासेने विचारले.

मोठ्यांदा हसत शांताराम म्हणाला "मी काय य. गो. जोशी आहे काय आठ आठ दिवसांनी दाढी करायला ? दर रविवारी चार जमतील ते स्नेही गोळा करून—आमचा पवार, पां. गो. लोहोकरे—बादशाही बोर्डिंगात जाऊन दही मिसळ चापतो !"

"अरेरे !" मी मनांत खजील झालो. हा कवी दहीमिसळ खातो, हे मी मुलाखतीत कसे लिहू ?

"बरं आठवले –" मुलाखत वल्हवीत पुढे नेण्याकरिता मी म्हटले, "समजा, आपण एखादी नवीन कविता केलीत—आणि ती आपल्याला आवडली--तर लहान मुलांना आकडी किंवा फिट्स येऊन ती किंचाळतात तितक्या तन्मयतेने आणि जिव्हाळ्याने आपण आपली कविता कधी गाता काय ?—किंवा कुणाला गाऊन दाखविता काय ?" मी जिज्ञासेने विचारले.

शांताराम आठवले आपल्या दोन्ही हातांचे पंजे चुरगाळीत म्हणाला, "नाही. इतका फिट आल्यासारखा जिव्हाळा अजून माझ्या कोणच्याच कवितेत उतरला नाही ! पण जोशीबुवा, हा प्रश्न तुम्हाला कशावरून सुचला ?"

"आपल्या मास्टर विनायकनं आपल्या चित्रपटात एक-दोन कवी इतक्या तल्लीनतेने गाताना आणि कविता करताना दाखविले आहेत, म्हणून मला कल्पना आली की कवी होणं फार त्रासाचं आणि कष्टाचं काम आहे ! बरं आठवले, आपण जेव्हा कविता करता तेव्हा शुद्धीवर असता काय ?"

या प्रश्नाचे उत्तर म्हणून शांताराम आठवले याने जवळच पडलेल्या एका कागदाची गोळी करून माझ्या अंगावरच हसत खेळत फेकली !

"अं हं ! आठवले, थट्टा नव्हे—म्हणजे मला आपल्याला असं विचारायचं आहे की, आपल्या जवळ प्रतिभा जास्त आहे की प्रतिभासाधन जास्त आहे ?"

हसतच उत्तर चालू झाले, "मी अजून माझ्या काव्याचं तसं तपशील वार टेंपरेचर घेतलं नाही ! आणि जोशीबुवा, अजून आम्हांला जगायच आहे की बरेच दिवस—इतक्यात आम्हांला असे निरवीचे प्रश्न का विचारतां ?"

"बरं, आपण मध्ये काही दिवस मलेरियाने आजारी होता—आणि त्याच वेळेला आपल्या *बीजांकुर या काव्यसंग्रहावर अभिप्राय येत होते-या दोन गोष्टींचा एकमेकांशी काही संबंध आहे काय ?"

"आपण आमच्यापेक्षा वयाने मोठे आहांत—म्हणून का होईना मी तुमच्याबद्दल आदर बाळगतो—म्हणून उत्तर देत नाही—पण एवढेच सांगतो माझ्याजवळ याच्यावरही उत्तर आहे हं !"

"असणारच ! यात काय संशय ! प्रश्न म्हटला की त्याला उत्तर आलंच ! बरं, मी आता तुम्हांला निरुत्तर करणारा प्रश्न विचारतो—" आणि मी थोडासा घुटमळलो. "जोशीबुवा, विडी शिलगवा म्हणजे असे बोलताना अडखळणार नाही !" कदाचित् माझ्याजवळ काड्याची पेटी नसेल या कल्पनेनं आठवले यांनी काड्याची पेटी आणून माझ्यापुढे टाकली तिने विडी पेटवीत व ती काड्याची पेटी मी आपल्या खिशात टाकीत विचारले, "आपल्या कवितांपैकी काही कविता भिकार असतात हे आपणांस कबूल आहे काय ?"

"अलबत् ! माझ्याही काही कविता भिकार आहेत. कित्येक नामवंत लेखकांच्या काही लघुकथा भिकार आहेत. कित्येक कादंबरीकारांच्या—

* बीजांकुर हा शांताराम आठवले यांचा मनोहर ग्रन्थमालेने प्रसिद्ध केलेला दुसरा कविता-संग्रह. मी शांताराम आठवले यांचा पहिला काव्यसंग्रह प्रसिद्ध केला आहे. त्याचे नाव "एकले बीज." तोच चांगला आहे असे माझे मत आहे.

पण तपशील कशाला ? जो उत्कृष्ट निर्माण करतो तो काही भिकारही निर्माण करतो !''

''का ?''

'' कारण--वर्षात सण थोडे असतात--साधे दिवसच फार असतात आणि सगळेच सण केले तर सणांत तरी गोडी राहील काय ? ''

''बरं, आपण कोणी असामान्य आहोत असा आपला भ्रम व्हायला सुरवात झाली आहे काय ?--का आपण सध्या त्याच भ्रमात आहांत ?''

''तसली रोगराई मला अजून झालेली नाही ! कदाचित् माझ्या काही कविता सामान्य असतील; पण मी असामान्य खास नव्हे ! अहो, आम्ही माणसे ! आयुष्य आणि भावना कुठे दुमडल्या गेल्या की तुम्ही गद्यांत लिहिता आम्ही पद्यात लिहीतो ! खरे कवी ज्ञानेश्वर, तुकाराम ! जे काव्य जगले ते कवी !'' शांतारामाच्या कांही तरी अंगांत आल्या-सारखे झाले होते. तो पुढे म्हणाला, ''अहो जोशीबुवा, आम्ही व्यवहार जगतो आणि काव्य लिहितो ! आपल्या आयुष्याचे वैभव आणि श्रेय यांची ज्यांनी सदावर्ते घातली ते कवी--द्रोघामध्येही कल्पनेची ठिणगी एकच ! पण !''

''अहो शांताराम, ढगांत चाललांत ! ढगांत चाललांत ! बरं, अलीकडे आपण फारशा कविता करीत नाही ?''

''अलीकडे म्हणजे केव्हापासून ? माझं लग्न झाल्यापासून असं म्हणायचं आहे तुम्हांला ?''

''छेः छेः ! त्यानंतर तर तुम्ही पुष्कळच काव्यखंड लिहिलेत !''

''मग अलीकड़े म्हणजे केव्हापासून !''

"तुम्हांला कन्यारत्न झाल्यापासून !"

"हाँऽ ! हाँऽ ! हाँ !" शांताराम आठवले येवढ्या मोठ्यांदा हंसला की ते हसे त्याचा चेहऱ्यावरही मावत नव्हते आणि त्याच्या आवाजालाही झेपत नव्हते !

"अगदी खरं ! जोशीबुवा अगदी खरं ! मुलीला खेळवताना—'मंगला' तिचे नाव—काव्याशीच खेळल्यासारखं वाटतं मला ! पण इथेही मला वाटतं आमच्या आयुष्याचा सामान्यपणाच प्रतीत होतो ! आमचं आयुष्य—अगदी कांही म्युनिसिपालिटीच्या दिव्यावर अभ्यास केल्याची सार्वजनिक थाप मारीत नाही मी—पण रखरखीत बाळवंटाप्रमाणेच गेलं. आता ही जी वेल वाढीला लागली आहे—तिच्या भोवती गारव्याचं खळं करावं—तिच्या हास्यांनी आपण हसावं—तिच्या दुःखानं आपण दुःखी व्हावं—काव्य केल्यापेक्षा—काव्य जगल्यासारखं वाटतं त्यात ! आता पुन्हा पाहा, हेच मला माझ्या मुलीबद्दलच फक्त इतक्या जाणीवेनं आणि जिव्हाळ्यानं वाटतं. हा आमचा सामान्यपणा—आणि हेच सर्वांबद्दल वाटणं तो खरा कवी !"

"शूकऽ शूकऽऽ शूक ! ! ! माझ्या अभिजात कवीबद्दलच्या कल्पना निराळ्या आहेत ! जो कवी फक्त स्त्री-जातीबद्दल—आणि त्याही तरुण आणि सुंदर—जिव्हाळा दाखवील तो जातिवंत कवी ! तिचे सुस्कारे जो ओकील तो युगप्रचारक कवी ! चरणरेघा विनाकरण वापरील तो असामान्य कवी ! कवी असण्यापेक्षा दिसण्याचा जो प्रयत्न करील तो अचाट कवी !" मी गंभीरपणाने बोलत होतो.

"तुम्हाला नेहमी गंभीर गोष्टीची चेष्टा करण्याची सवय आहे ! पण

जोशीबुवा इतकं हे चांगलं नाही ! अशी चेष्टा करण्यामागची तुमची चीड मला माहीत आहे. हिंदुस्थानांत सध्या फारशी असामान्य माणसे नसताना—असामान्य, कर्तबगार माणसांचं सध्या जे जाहिरातींत पेव फुटलं आहे ! जाहिरातीत वाङ्‌मय ओरपताहेत आणि वाङ्‌मयात एकमेकांची तमाशेवजा जाहिरात चालविली आहे ...!"

"बरं आपलं 'बीजांकुर' पुस्तक काय म्हणते आहे ?"

"मला जितकं ते आवडलं—तितकं ते लोकांना आवडलेलं दिसत नाही—आणि त्या लोकांतच तुम्ही प्रमुख आहांत.........!"

ज्या एका विशिष्ट सुरात मला शांताराम आठवलेची मुलाखत घ्यायची होती ते जमलेच नाही. मला मुलाखतभर थट्टेखोर वातावरण ठेवायचे होते ! पण शांताराम पडला कवी—तो आपल्या भावनांचे सूर मधनं मधनं टेकायला लागला ! मग मीही मुलाखतीचा नाद सोडला आणि मनात म्हटले—पहिल्यांदा चहा प्यायला म्हणून जाऊन – मुलाखत घेऊन आलो आणि आता मुलाखत घेण्याचं निमित्त करून—शांताराम आठवलेचे शब्दचित्रच मुलाखत म्हणून काढू !

मला शांताराम आठवले आवडतो तो त्याच्या कवितेपेक्षा—त्याच्या साध्या आणि निरुपद्रवी पण प्रमाणिक आयुष्याबद्दल !

माझे जे एक चार-दोन वाङ्‌मयस्नेही आहेत की जे माझ्या लेखनातले 'बरें' सांगण्यापेक्षा 'वाईट' अगोदर येऊन सांगतात—त्यांत शांताराम आठवले आहे ! आम्ही एकमेकांच्या वाङ्‌मयाची पुष्कळ वेळेला खरी-खोटी निंदा करतो—पण त्याचा आमच्या स्नेहावर परिणाम होत नाही !

शांताराम आठवले ! एक साधा माणूस ! कविता करतो—पण वृत्तीने फारसा कवी नाही !—त्याच्या लग्नाची केविलवाणी गंमत--

घरचे पाहाणारे कोणी नाही—सिनेमा कंपनीत नोकरी-आणि शिवाय कवी ! त्यांना मुलगी द्यायलाच कोणी तयार होईना !

—पण याहीमुळे तो समाजावर तडफडला नाही !

"लोकांचेही बरोबर आहे—!" त्या वेळी तो मला म्हणाला होता, "अहो, मी जो धंदा करतो आणि जात सांगतो—त्यांचा अनुभव ऐकून लोकांनी असं का वागू नये?—अहो, त्यांच्या मुलीच्या सबंध आयुष्याचा प्रश्न असतो त्याच्यात ! आणि त्यांना तरी काय माहीत की, त्या जातीतील मी एक—सद्वर्तनाची आणि कल्पनांची धुमी पेटवून बसलो आहे म्हणून !"

त्यांनी दारिद्र्यही काढलं आहे—पण अभिमानी वृत्तीनं ! आणि ते आज सुखी आहेत. पण आपल्या कर्तबगारीनं हे झालं आहे. असा त्यांचा भ्रम अजिबात नाही !

"चारित्र्य" या शब्दाला काही अर्थं आहे, असा माझ्याप्रमाणेच त्यांचाही गैरसमज आहे ! आणि घडलेल्या चारित्र्याचा नकाशा काढून—आपल्या अपवादात्मक आयुष्याचा नियम म्हणून लोकांना सांगून—त्यांना खिजवायलाही ते तयार नाहीत ! आता त्यांना मराठी येत आहे हे सांगण्याची जरूरी नाही—पण त्या मराठी अक्षरांतील वेचक अक्षरं-विनाकारण एकापुढे एक ठेवून—त्यांतून ते एखादा जगाला देण्याकरिता संदेश ही तयार करीत नाहीत !

—आणि फिल्म कंपनीत राहूनसुद्धा !

कारण आठवले हा वृत्तीने फिरता पारवा नसल्यामुळे-त्याचे सुख

प्रभात कंपनीवर अवलंबून आहे—आणि प्रभात कंपनी एकच आहे – अणि तिला शांताराम आठवले पुरेसे आहेत !

शांताराम आठवले. बुद्धी आहे—भावना आहे—कर्तबगारीची लालसा आहे; पण त्या मानाने वाढायला जागा नाही—फोफावायला मार्ग नाही ! आणि इच्छाही नाही ! स्वतःला झांबणाऱ्या गारठ्यापुरती—विचारांची आणि आचारांचा शेकोटी पेटवून बसलेला तो एक साधा जीव आहे ! तो शेकत बसला आहे आणि कुणीही ओळखीने जाणि सलगीने यावे आणि शेकून जावे—जागतिक अपेक्षा आणि आकांक्षा काही नाहीत.

इतक्यात शांताराम आठवलेचा गडी एक मोठी करंडी घेऊन तिथे आला आणि त्याने त्या रिकाम्या करंडीत टेबलावरची मोसंबी-संत्री भरायला सुरुवात केली--"पत्नी जरा गावी गेली आहे, तिला पाठवितो--" असे म्हणून शांताराम ती करंडी शिवू लागला. करंडी शिवण्यानेही तो कवी दमला आणि घामजला व नंतर हाश्य-हुश्य करीत शांताराम म्हणतो–

"काय, जोशीबुवा, चहा घेणार काय ?'

मी मनात म्हटले—संत्री-मोसंबीही गेली – मुलाखतीचेही शब्दचित्र झाले आणि वर हा गृहस्थ नुसत्या चहावर माझी बोळवण करणार. मी दुसऱ्या चिडीने म्हटले, "चला बाहेर-आज तुझ्या घरात कोणी नाही-मीच तुला आज चहा आणि दही-मिसळ खायला घालतो—"

—आणि त्या दिवशी मुलाखतीकरिता माझ्या खिशालाच चट्टा बसला !

———

## सदू गोडबोले : : : ४

[ सद् गोडबोले यांचे सबंध नाव सदाशिव गणेश गोडबोले" हेच त्यांना बहुमानार्थी नाव वाटते." काही वर्षांपूर्वी सहज कौतुक म्हणून त्यानी दाढी ठेवून पाहिली होती. नंतर एकदा त्यांनी दाढीसकट आपला फोटो काढून घेतला फोटो निघाल्यानंतर अर्थात् त्यांना प्रत्यक्ष दाढी ठेवण्याचे कारणच उरले नाही ! सिनेमा कंपन्यांनी त्यांचे नाव लक्षात ठेवावे व एखाद्या कंपनीस त्याकडे जाण्याची सदिच्छा झाल्यास ' ही मुलाखत वाचून आपण आलो" असा अगत्य पूर्वक उल्लेख करावा. स्वतःच्या जीवनाला स्वतंत्र ओघ देण्याचे ज्यांना आतापर्यंतच्या आयुष्यात जमलेले नाही; तरीही गडी आनंदित असतो. लोकमान्य टिळकांच्या खालोखाल यांना सेनापती बापटांबद्दल आदर आहे. व्यायामाच्या शिकवण्या. करून हे वेळ काढतात ]

"काय म्हणता, माझी मुलाखत घेणार ?" अंगात एक पट्ट्याचा

गंजिफ्रॉक घातलेला आणि खाकी पँट घातलेला गृहस्थ माझ्यापुढे येऊन दंड थोपटीत म्हणाला.

तो गृहस्थ म्हणजे सदू गोडबोले हे आता मी सांगणार नाही—ते वाचकानीच ओळखावे.

'किती वेळ लागेल मुलाखतीला ?—माझी अजून रोजची मेहनत व्हायची आहे—तेव्हा तुम्हाला थोडे थांबायला पाहिजे—पुन्हा यायला सवड नसेल तर आत्ता मी जोर-बैठका काढतानाच तुम्हाला माझी मुलाखत घ्यावी लागेल !'

'म्हणजे मुलाखत द्यायला तुमची तयारी आहे ना ?' मी साळसूदपणाने विचारले.

'आता तुम्हाला नाही कसं म्हणायचं जोशीबुवा ?' सदू गोडबोलेही साळसूदपणानेच म्हणाला. 'आणि जोशोबुवा, मुलाखत ही काय नाही म्हणण्यासारखी गोष्ट आहे होय ? अहो, मुलाखतच काय—मुलाखतीच्या शेवटी एक ओजस्वी संदेश—तुम्हाला—राष्ट्राला किंवा मातृभूमीला द्यायचा विचार आताच माझ्या मनात आले आहे !' एवढे म्हणताना सदुभाऊंनी चार जोर काढले.

"पण—मी-राष्ट्रांनी किंवा मातृभूमीनी तो संदेश घेतला नाही तर ?" मी शंका प्रदर्शित केली.

"– नाही घेतलात तर नशीब तुमचं ! मी काय करणार त्याला ! अहो, सिनेमाच्या हँडबिलाचं नाही का–वाटणारा वाटीत जातो–घेणारा घेतो, वाचतो, नाही तर चुरगाळून फेंकून देतो–पण म्हणून काय हँडबिलाची किंमत कमी होते काय ? मी असे अभिमानाने म्हणू शकतो की,

सिनेमाच्या हँडबिलापेक्षा 'संदेश' कोणच्याही बाबतीत कमी नाही ! बरं, आज मुलाखतीकरिता आमची कशावरनं आठवण झाली तुम्हाला ?— बाकी मला परवापासून उचकी लागली होती हं-तेव्हाच मला वाटलं कोणातरी माझी सारखी आठवण काढतं आहे ! आणि आता लक्षात आलं बरं का—कालपरवाच्या माझ्या उचक्या थोड्या मोठ्या होत्या ! बरोबरच आहे-नुसत्या आठवणीची उचकी निराळी आणि मुलाखतीची उचकी केव्हाही मोठीच असणार ! बरं जोशीबुवा, आपण माझीशी मुलाखत घ्यायचं ठरवलंत ? असं काय वैशिष्ट्य वाटलं तुम्हाला माझ्यात ?" सदुभाऊंनी प्रांजळपणाने विचारले.

प्रांजवळपणाला अर्थात् प्रांजळपणानेच उत्तर द्यायला पाहिजे म्हणून मी म्हटले "त्याचं असं झालं-आपल्या कदाचित् पाहण्यात आल असेल मी सह्याद्री मसिकात 'अनौपचारिक मुलाखती' देत असतो आणि या महिन्याकरिता ज्या गृहस्थाची मुलाखत घ्यायची मी ठरविलं होतं-तो अचानक गेला गावाला निघून-ते कळताच मी थोडा काळजीत पडलो—पण शेवटी ठरवलं—चला अगदीच कुणी नाही तर आपले सदू गोडबोले आहेतच !"

"जोशीबुवा जरा जपून बोला ! अगदीच कुणी नाही म्हणून माझ्याकडे आलांत ?—तुम्ही मला काय समजता ?"

प्रश्नावरून सदूभाऊ रागात होते हे कोणालाही कळेल.

मी खाली मान घालून म्हटले, "तुम्हाला काय समजायचं आहे ? मी तुम्हाला सदू गोडबोले समजतो ! चूक नाहीना होत यात माझी काही ?

"—मग आत्ताच मुलाखत घेऊन चला ! राहू द्या राहिला तर आमचा व्यायाम ! नाही तर आम्ही थोडे आढेवेढे घ्यावे आणि तेवढ्यात

तुम्हाला कोणी तरी मुलाखत घ्यायला भेटावा—मग आमची मुलाखत जन्मभर पडून राह्यचो. हं, घ्या लिहून मुलाखत !" सदुभाऊ थोरल्या शाहू महाराजांसारखे बैठक मारून माझ्यापुढे बसत म्हणाले.

मी मुकाट्याने फाउन्टनपेन काढून लिहू लागलो.

"हं–मी सदू गोडबोले–उमर वर्षे बेचाळीस. वजन पौंड ५०० (मोटार सायकल सकट), नुसते १९० पौंड; वर्ण निमगोरा. कारणे मुलाखत लिहून देतो की—वास्तविक आम्हांस मुलाखत देण्याची अजिबात जरूरी नाही. पण केवळ आपली अडचण ओळखून थोडे मित्रकार्य करावे आणि जमल्यास फुटकटात प्रसिद्धि पदरात पाडून घ्यावी ह्या उच्च हेतूने प्रेरित होऊन मी ही मुलाखत आपणांस देत आहे ! एक लक्षात ठेवणे की आम्हाजवळ शरीर बल आहे. एक वेळ कुस्त्याही लढलो-खेळाडूही आहोंत–पण विद्वान नाहीत !" माझ्याकडे करड्या नजरेने रोखून पाहात सदुभाऊ म्हणाले.

मी अजीजीने म्हटले, "पण··आपण विद्वान नाहीत–या खुलाशाची जरूरी काय सदुभाऊ ? मला वाटतं तसा तुमच्याबद्दल कोणचाही गैरसमज नाही !"

"ते मलाही माहीत आहे हो ! पण राजश्री, तसा गैरसमज कदाचित् माझी मुलाखत लिहिताना तुम्ही करून घ्याल हा धोका लक्षात घेऊन मो हा स्पष्ट खुलासा करीत आहे ! कारण 'मुलाखतीपुरते' आम्ही मोठे–कर्तबगार–आणि विद्वान् असावे–ही तुमची गरज असते ! तेव्हा माझी मुलाखत मी देणार-तुम्ही नुसते मुकाट्याने लिहून घ्या !"

"पण सदुभाऊ, 'मुलाखत' प्रश्नोत्तरस्वरूपात लागते !"

"मग माझी कुठे हरकत आहे त्याला ? मी आत्ता फक्त माझी उत्तरे देऊन ठेवतो–त्याला लागणारे प्रश्न तुम्ही नंतर सावकाश तयार करा !"

नंतर एकदम चिडलेल्या बोक्यासारखा चेहरा करीत सदुभाऊ म्हणाले, "लेखक आहांत का कोण आहांत ? लोकांबद्दल भलभलते गैर-समज पसरविण्याची तुम्हांला भयंकर खोड नसते ! सुमारे सहा वर्षांपूर्वी तुम्हा लोकांच्या या उपद्व्यापामुळे मी जवळ जवळ 'क्षयाच्या प्रथमावस्थेत' होतो."

"बापरे ! तुम्ही आणि क्षय ?—कारण ?" मी.

"त्या वेळी मी अशाच मासिकांमधल्या मुलाखती वाचीत असे ! आणि नंतर मी आपला झुरणीला लागलो—येवढ्या मोठ्या लोकांत आपण जगायचं कसं ?—शेवटी जेव्हा माझ्या एका ओळखीच्याच माणसाची मुलाखत माझ्या वाचनात आली—तो माणूस मला पूर्ण माहीत—आणि त्याचीच साग्र संगीत मुलाखत मला वाचायला मिळाली—काय काव्य आणि कला होती हो त्या मुलाखतीत ! मी माझ्या त्या ओळखीच्या माणसाकडे पाहिले–मुलाखतीकडे पाहिले—अहो कशाला काहो मेळ ? तरी मला त्या तसल्या मुलाखती वाचून मधनं मधनं शंका यायचीच हं–की इतकीं दर महिन्याला मुलाखती घेण्याइतकीं मोठा माणसं असताना हिंदुस्थानचं अद्याप बरंवाईट व्हायचं राहिलं कसं ? आणि काय एक एक मुलाखतीची हेडिंग पाहा, 'खानावळवाल्याचा गव्हर्नर कसा झाला ?' जोशीबुवा, माझ्या मुलाखतीला हेडिंग घाला, 'ब्राह्मणी सदऱ्याची मुंडेछाट पैरण कशी झाली ?' दुसऱ्या एका मुलाखतीत वाचलं—'त्याला पन्नास रुपये पगार होता–पण साहेब त्याच्यावर खूष होऊन त्याला एकदम साडेसातशे

रुपये पगार केला !' वारे वा !—आमच्यावर साहेब खूष झाला असता तर आम्ही तो पगार घेतला नसता काय ?" सदुभाऊ आता अगदी खुशीत आले होते.

—आणि हा पहिलवान इतका-बोलेल अशी मला कल्पना नव्हती !

"एक सांगतो जोशीबुवा तुम्हांला—ही मुलाखत घेतलेली माणसे मुलाखतीत पाहिली—आणि त्या दृष्टीने मुलाखत न घेतलेली माणसे पाहिली —तर असं वाटतं—एखाद्या लॉटरीची तिकीटं घेतलेल्या माणसांच्या यादींतून फक्त बक्षिस मिळालेल्या माणसांची निराळी यादी वाटते ती ! कर्तबगार माणसे आहेत—त्यांची चरित्रही सांगण्यासारखी आहेत—पण त्यांच्या मुलाखती इतक्या कलेत बुचकळलेल्या असतात की, त्यांतली कर्तबगारी किंवा विचार डोळ्यांत भरण्याऐवजी-वैभवाचे बेगड डोळ्यांत भारतं—आणि आटपाट नगरच्या राज्यात जसे चमत्कार असतात—तशा त्या मुलाखती चमत्कारिक वाटतात !"

"सदुभाऊ, आपली मुलाखत भलत्या वाटेने चालली आहे असं नाही तुम्हांला वाटत ?" मी विचारलें.

"पण हेच लिहून घ्यायला पाहिजे तुम्ही ! मुलाखतीसंबंधाने एका पैलवानाची मतं काय आहेत ते तरी कळू द्या एकदा लोकांना !" सदुभाऊ खुल्या दिलाने म्हणाले.

"बरं पण आपल्या आयुष्याबद्दल सांगाना काही तरी ?" मी विचारलें.

"तसं सांगण्यासारखं माझ्या आयुष्यात काही नाही बघा ! म्हणजे मी माझ्या आयुष्याला कंटाळलो आहे किंवा माझ्या आयुष्यात मी दुःखी आहे, असा अजिबात अर्थ नाही हं त्याचा ! तसा मी माझ्या आयुष्यात स्थिर आहे. आणि सेनापती बापट हे माझं दैवत आहे ! थोडंसं उपमेत सांगतों.

गावाच्या एखाद्या कोपऱ्यावर एक मोठा थोरला जुना वड असतो ना ?—तसं माझं आयुष्य आहे बघा ! या वडाचं, सदू गोडबोल्याचं वय आज बेचाळीस वर्षांचं आहे ! लोक म्हणतात 'ताकत कमवा-ताकत कमवा !' कमावली ताकत ! सांगा आता—काय करू या ताकतीचं ? वडाची पाने जशी दुखल्या खुपल्यावर उपयोगी पडतात-तसे माझ्या आयुष्याचे काही क्षण-अंगातील ताकतीसुद्धा ताकांच्या उपयोगी पडतात ! पण एखाद्याच्या मनाची एक ताठरवृत्ती असते-त्याला तडजोड माहीत नसते-किंवा जमत नाही ! आणि तडजोडीशिवाय व्यावहारिक यश नाही ! —व्यावहारिक वैभव नाही आणि सुखही पण नाही ! जगातील सर्व व्यवहार म्हणजे तडजोड ! राजकारण म्हणजे तडजोड ! पक्ष म्हणजे तडजोड ! आज ' हा ' या पक्षात का आणि उद्या नेमका ' ताच ' दुसऱ्या पक्षात का ?-याचं उत्तर तडजोड ! पण काही आयुष्ये अशा तडजोडीला कबूल नसतात ! मग त्यांची हालचाल थंडावते आणि मग तथा माणसांचे माझ्यासारखे वटवृक्ष निर्माण होतात ! त्यांतले काही वड लहान असतात, काही मोठे असतात ! त्यामुळे आमची सर्वांकडे नजर असते; पण आम्हाला त्यांतल्या कशाबद्दलच तसा जिव्हाळा वाटत नाही ! म्हणूनच आम्ही असे परखड बोलू शकतो !" सादू गोडबोले एवढे बोलून खिडकी-वाटे बाहेर आकशाकडे पाहू लागला !

आरशाचा कवडसा तोंडावर पडल्यामुळे जशी आपल्या चेहेऱ्याची चलबिचल होते, त्याप्रमाणे आभाळाचा कबडसा सदुभाऊंच्या तोंडावर पडल्यासारखें मला वाटलें. त्यांनी आपले दोन्ही ओठ थोडेसे दाताखाली मुरडून घेतल्यासारखे केले आणि थोडेसे अडखळत म्हणाले, "जोशीबुवा, माणसाचे जीवन म्हणजे वस्त्राचे उभे धागे-पण परिस्थितीचे आडवे धागे

ज्या किमतीचे येतील–त्याप्रमाणे वस्त्राला मोल आणि किंमत येणार ! माणसानं स्वच्छ आणि तयार असणं एवढीच फक्त माणसाची कर्तबगारी ! समजा, योगायोगानं आयुष्याचं वस्त्र विणलं गेलं नाही, तरी हताश किंवा उदास व्हायचे कारण नाही ! सगळ्याच गारगोटया काही एकमेकांवर घासून त्यांतून ठिणग्या पडत नाहीत !" कारण नसतानाच एवढं बोलून सदुभाऊ एकदोन मिनिटे थांबले आणि म्हणाले, "मध्यंतरी मलाही माझं आयुष्य थोडंसं भकास वाटायला लागलं होतं—म्हणून मी काही पायी—रेल्वेनं अशा खूप यात्रा केल्या—त्यामुळे एक फायदा झाला. स्वतःबद्दल थोडंसं जे भकास वाटत होतं— त्याला थोडी उदात्ततेची छटा आली !"

सदुभाऊंच्या खोलीत सेनापती बापटांची एक मोठी तसबीर प्रामुख्याने दिसत होती; त्या तसबिरीजवळ सदुभाऊ काहीसे आवेगाने गेले— जवळच्याच एका फडक्याने त्यांनी तसबिरीवरची 'होती नव्हती' इतक्याच स्वरूपातली धूळ पुसली आणि जणू त्या तसबिरीला आलिंगन देण्याच्या आवेशाने त्या तसबिरीच्या भिंतीवर आपुलकीने आपल्या दोन्ही हाताचे पंजे टेकले आणि ते म्हणाले, "जोशीबुवा, प्रवासात एखाद्या डोंगराचा एखादा एकाकी सुळका दिसावा ना— तसं सेनापति बापटांच्या आयुष्याकडे

[ सदुभाऊ गोडबोले यांनी सिनेमात एकदाच काम केले; पण तेवढ्यात त्यांनी आपल्याबद्दल असा दरारा निर्माण केला की पुनः त्या बाबतीत त्यांच्या कोणीही वाटेस जाऊ शकले नाही ! ]

पाहून वाटतं—नाही ? सैन्याशिवायच सेनापती ! व्यावहारिक तडजोड जमलीच नाही त्यांना आयुष्यात !"

आणि मग एकदम धाडधाड पाऊस पडून जाऊन एकदम ऊन पडून उकडायला लागावे अशी सदुभाऊंची वृत्ती निर्माण झाली !

सदुभाऊंनी आपल्या भाषणाचा रागरंग एकदम बदलला. घरातल्या एखाद्या खिडकीतून वारा जास्त यायला लागला म्हणजे जशी आपण ती खिडकी लावून घेतो, त्याप्रमाणे सदुभाऊंनी ते तसले संभाषण अजीबात बंद केले, आणि एकदम हसऱ्यावेळल्या सुरात माझ्या खांद्यावर हात टाकीत ते म्हणाले, "मधे जोशीबुवा आम्ही एकदा सिनेमा कंपनीत काम केले होत–काही 'रावणाचं' कथानक होतं वाटतं !"

"असं ! मग आपण कसलं त्यात मंदोदरीचं काम केलं होतंत काय ?" मी आपला आदमास दाखवीत म्हटले.

"काय जोशीबुवा. वा: ! वा: ! ! मंदोदरीचं काम आणि मी ?" सदुभाऊ उद्‌गारले.

"का ? अशक्य काय आहे त्यात ?" मी अभिमानाने म्हटले, "सिनेमा सृष्टीत ट्रिक सीन असतात ना ? तशी तुमच्या बाबतीत कंपनीनंही काही 'ट्रिक' केली असेल !"

"नाही, मी खुद्द रावणाचंच काम केलं होतं !" सदुभाऊ लीनपणाने म्हणाले.

"बरं, मला असं सांगा, तुमची आणि कंपनीची गाठ पडली म्हणून कंपनीन 'रावणाचा' चित्रपट घेतला का चित्रपटात 'रावण' सापडला म्हणून कंपनीने तुमचा शोध केला ?" मी गांभीर्याने विचारले.

"हा प्रश्न मंजूर नाही ! दुसरा प्रश्न विचारा" सदुभाऊंनी हमरीतुमरीने म्हटले.

"बरं, मग ! मी आता माझ्याच जिव्हाळ्याचा प्रश्न विचारतो तुम्हाला ! माझ्या प्रकाशनापैकी कोणची पुस्तके आवडतात तुम्हांला ?"

सदुभाऊंनी आपली ट्रंक उघडली आणि त्यातून मळकी आणि खराब झालेली चार पुस्तके बाहेर काढली; त्यांची यादी खालीलप्रमाणे होती.—

( १ ) राजबदी – लेखक डॉ गोवंडे, किंमत १॥ रुपया ( २ ) चुटके आणि चमत्कार–लेखक पु. रा. भिडे, किंमत फक्त १० आणे. ( ३ ) बलिदात ( कादंबरी ) — लेखक तात्यासाहेब केळकर, किंमत २ रुपये. (४) आनंदीबाई पेशवे (चरित्र) – लेखक चिं. ग. कर्वे, किंमत ६ आणे.

"बरं काय हो सदुभाऊ ? हीच पुस्तके तुम्हांला का आवडली ?" मी विचारले.

"बाकीची तुम्ही आम्हाला दिलीं नाहीत म्हणून !—मग केव्हा येऊ आता तुमच्याकडे ?" सदुभाऊ फारच आपुलकी दाखवायला लागले.

"सध्याच नको—मी आता जरा वर्ष दोन वर्षं गावाला जाणार आहे ! "—बरं, ते असू द्या; पण तुमची राजकारणांत मतं काय आहेत ?" केवढा गंभीर प्रश्न !

पण माझा तो प्रश्न ऐकून सदुभाऊ ताडकन् उठून उभे राहिले आणि म्हणाले, "मतं ? मतं ? आता कुठे शिल्लक आहेत आमच्याजवळ मतं ? आमच्या जवळ होती नव्हती ती मतं आम्ही परवाच्याच इलेक्शनमध्ये देऊन टाकलीं की !"

"बरं, आपला आहार काय ?" जीविताचा प्रश्न.

"तुम्हाला काय करायचं आहे त्याच्याशीं ? माझ्यासारखा आहार ठेवून काय पैलवान व्हायचं आहे तुम्हाला ? तसं असेल तर अगोदर रोज इथे नेमाने येऊन मेहनत करा—मग सांगेन काय आहार ठेवायचा तो—"

"अहो, हा प्रश्न मी स्वार्थाने विचारीत नाही ! केवळ लोककल्याणा-करिता !"

"—ज्यांना जरूर असेल ते सरळ माझ्याकडे येतील—त्याला तुमची मध्यस्थी कशाला ? आणि गावोगावी—शहरोशहरी—खेडोखेडी—सदू गोडबोले काय कमी आहेत होय ? सगळं ज्ञान आणि विद्वता वाङ्मयात ओतून टाकली तर मग माणसांचे काय काम ? मी तुम्हां लेखक लोकांचं पाहून ठेवलंय--तुमची कृती थोडी आणि मचमचच फार !"

आणि अशी उत्तरे यायला लागल्यानंतर मुलाखत संपविणे क्रमप्राप्तच नव्हते काय ?

मी उठलो. सदुभाऊंना अदबीने नमस्कार केला. त्यांनीही 'सलाम आलेकुम !' म्हणून थोडयाशा हेटाळणीनं माझ्या नमस्काराची परतफेड केली.

"बरं सदुभाऊ, आम्ही येवढी तुमची मुलाखत घेतली. मुलाखतीचे एक तंत्र असं आहे की, त्यात मुलाखत घेणाऱ्याच्या जन्मभर लक्षात राहील असं काही घडावं लागतं. पण त्यातही आम्ही तुम्हांला सवलत देतो. आम्हांला नुसता चहा आणि खारी बिस्किटे यांचा खुराक द्या, आम्ही त्याचीच जन्मभर आठवण ठेवू !" मी आपुलकीने म्हटले.

"माझे घर म्हणजे काय 'खुराक' मिळण्याचे ठिकाण वाटले काय तुम्हांला ? येथे खुराक वगैरे काही नाही ! अजीर्ण झाले असेल तर जोर काढायला लावतो इथे, म्हणजे पचन होऊन ढेकरा येतील तुम्हांला अन मग त्याचीच आठवण ठेवा जन्मभर ! किंवा अंग दुखत असेल तर पाठ चेपू का जरा ?" सदुभाऊ आपल्या धंद्याच्या तंद्रीत म्हणाले.

"नको, पाठ दुखायला लागेल माझी विनाकारण—!"

सदुभाऊ लगेच शंकित स्वराने म्हणाले, "पण काय हो, ही मुलाखत खरंच छापून येणार का ? पण जर येणार असेल तर मी दिली अशीच अक्षरन् अक्षर आली पाहिजे हं—जर साफसफाई करण्यांच्या मिषानं—आणखी काही दडपलंत किंवा यातलं काही कमी केलंत—तर एका पैल-वानाशी गाठ आहे येवढं लक्षात असू द्या !" दंड थोपटल्याचा आवाज.

"ठीक आहे !" मी म्हटलं. माझ्या मुलाखतीची ठरीव पाने भरली. होती त्यामुळे ताडकन् उठून मी सदुभाऊंच्या खोलीतून बाहेर पडलो. आणि सदुभाऊंनी हाक मारलीच तर पुनः परत येण्याचा प्रसंग येऊ नये म्हणून झपझप पावले टाकीत मी जिना उतरलो.

पण—!

मी खाली येऊन उभा राहून बुटात अडकलेला खडा काढण्याच्या नादात होतो तोच वरची सदुभाऊंची खोली धाडकन् लावल्याचा आवाज झाला, धाडधाड जिनाही वाजला आणि माझ्या खांद्यावर अचानक दोन जड हात येऊन पडले. आणि हसत हसत आवाज आला, "अहो जोशी-बुवा, संदेश द्यायचा राहिलाच की !"

मी कपाळावर हात मारीत केविलवाणेपणाने म्हटले, "अता संदेश नको बुवा. नुसती मुलाखतच दणदणीत झाली आहे-त्यांत आता आणखी 'संदेशाची' अडगळ कशाला ?"

"अडगळ म्हणा–घाण म्हणा–काय वाटेल ते म्हणा–मी संदेश देणार आणि तो माझ्या मुलाखतीत यायलाच पाहिजे ! पण 'संदेश' मात्र तुम्ही सांगाल तितक्या ओळींचा देतो-बोला किती ओळींचा 'संदेश' देऊ ?"

"आता इतका आग्रह केल्यानंतर नाही म्हणायचंही जिवावर येत

आहे माझ्या ! बरं, द्या आता संदेश–पण तो जास्तीत जास्त अडीच किंवा तीन इञ्च लांबीच्यावर असता कामा नये !"

"हात्तिच्या ! अडीच तीन इंचांत काय वाट्टेल ते सांगता येईल."

"पण काय वाट्टेल ते मात्र सांगू नका हं !" मी शब्दाची उलटापालट करून पाहिली.

"याला काय कोटी म्हणायचं काहो जोशीबुवा ?" सदुभाऊ उद्‌गारले.

"या प्रश्नानं-संदेशातली १/१० इञ्च कमी झाली हं !" मी सूचना दिली.

"तुम्ही असं बोलल्यानंतर मी हसायला पाहिजे असेल !" सदुभाऊ खोटं हसत म्हणाले.

"हं हसा—पण संदेश लौकर द्या !"

"मी परवाच एक मोटार सायकल विकत घेतली आहे !"

"संदेश—!" मी ओरडलो.

"संदेशावरचंच पॅकिंग आहे हे-ते सोडल्याशिवाय संदेश कसा आतून बाहेर येणार ?"

"ठीक आहे-!" माझा इलाजच नव्हता.

"ती मोटारसायकल मूळ सोळाशे रुपयांची, पण मी साडेआठशेला घेतली !"

"आपण फार व्यवहारकुशल आहात !"

"ती मोटारसायकल चालायला फार चांगली आहे !"

"त्याच्या पाठीमागं माणसाचे कॅरियर आहे काय ?"

"आहे !"

"मग आम्हांला तेवढं घरी पोहोचवा की !"

"ती सायकल मी फक्त संध्याकाळीच बाहेर काढतो !"

"ठीक आहे. आपली सदिच्छा कळली !"

आणि नंतर एकदम सदुभाऊंना कसला रागाचा झटका आला कुणास ठाऊक. त्यांनी झटकन् आपली मोटारसायकल बाहेर काढली–तिच्यावर ते रुबाबात आरूढ झाले, त्यांनी सायकल 'स्टार्ट' केली आणि गाडी चालू झाली. जाताना त्यांनी मला आदबीने 'रामराम' ही केला.

सदुभाऊ माझ्या दृष्टिपथातून नाहीसे होईपर्यंत मी त्यांच्याकडे पाहत होतो. मोटारसायकलचा धूर—आवाज—आणि त्यांच्यातूनच खालील शब्द माझ्या कानांवर आले—

"जोशीबुवा, माझी मुलाखत छापली नाहीत तरी चालेल ! 'सह्याद्री' मासिकातल्या आपल्या गेल्या दोन्ही अंकांतील मुलाखती मी वाचलेल्या आहेत ! आम्हीही तुमच्यापेक्षा कमी नाहीत हे दाखविण्याकरिता मी अशी मुलाखत दिली ! पण माझ्या दृष्टीने मोटारसायकल आणि मुलाखत यांची किंमत एकच ! हे सुद्धा फार होतं आहे–मोटारसायकलचा हॉर्न आणि मुलाखत यांचीच बरोबरी होईल ! मुलाखतीचा मुख्य उद्देश लोकांना आपल्याकडे पाहायला लावणे ! ते काम रस्त्यात नुसतं 'हॉर्न' वाजवीत फिरल्यानेही होईल ! आणि माझ्याजवळ तर संबंध मोटारसायकल आहे– आणि शिवाय व्यायाम ! अच्छा ! राम–राम !!"

* * *

## रंगा सोहनी : : : ५

"या-या या-" मी उत्साहाने हाक मारली संध्याकाळची सहा साडे-सहाची वेळ होती ती. आणि आपला एखादा दिवस काहीतरी चमत्कारिक जातो-त्या दिवशी सबंध दिवसात मी कुठे बाहेर पडलो नव्हतो आणि माझ्याकडेही सबंध दिवसात कोणी आले नव्हते. त्यामुळे ती तीन माणसे माझ्याकडे येताना दिसताच "या-या-या" म्हणून मी अत्यंत उत्साहाने हाक मारली.

—आणि ती तीन माणसंही खुशीत हसत हसतच माझ्या "य. गो. जोशी प्रकाशन कार्यालय" ऊर्फ दोन खणांच्या खोलीत आलीं.

—त्यांपैकी एक श्री. माधवराव गद्रे* हे माझे स्नेही होते आणि त्यांच्याबरोबर आलेली दोन माणसे माझ्या अजिबात ओळखीची नव्हती !

* यांची मुलाखत पुढे येण्याचा संभव आहे.

ती दोनहा माणसे होती तरुणच. त्यांतील एक सुमारे तेवीस चोवीस वर्षांचा होता–आणि दुसरा अठ्ठावीस–एकोणतीस वर्षांचा दिसत होता. दोन्हीही माणसे हसतमुख दिसत होती.

—त्यांतील वयाने तेवीस-चोवीस वर्षांचा जो तरुण होता. तो गोरा-पान आणि बांधेसूद दिसत होता. त्याचा चेहराही स्मितयुक्त हसरा होता आणि दुसऱ्याचा नुसताच हसरा होता !

"हं, काय म्हणताहेत तुमच्या सह्याद्रीतल्या अनौपचारिक मुलाखती ?" माधवराव गद्र्यांनीं मला हसत हसतच विचारले.

"ठीक म्हणताहेत ! काहींना त्या चांगल्या वाटतात. काहींना भिकार वाटतात ! काहींची तक्रार माणसांबद्दलच आहे ! त्यांना वाटते ही माणसे मी काय हुडकून काढिली ? माझ्यासारख्यांनी म्हणजे वास्तविक 'हिटलर, मुसोलिनी, डी. व्हॅलेरा' यांच्या मुलाखती घ्याव्यात–आणि तुम्हीही जाण-ताच की मी मनात आणलं तर मलाही ते अशक्य आहे असं नाही ! पण माझी एक मनोवृत्ती अशी आहे की, होता होईल तो कुणाच्या धंद्यात आड यायचं नाही ! म्हणून मुलाखत घेण्यासारखी मोठी माणसे–हा मुला-खतीचा धंदा ज्यांनी उर्जितावस्थेस आणला त्यांच्याकरिता मी राखून ठेविली आहेत ! मी मुलाखतीकरिता माणसे निवडणार तो माझ्या बरो-बरींची !–बरं, आज इकडे कुठे तुम्ही ?"

"म्हटलं–आपल्याही मुलाखतीची वर्णी लागली तर पाहावी म्हणून आलो !" माधवराव गद्र्यांनी म्हटले.

"बरं, थट्टा जाऊ द्या ! आमच्या कामाचं काय केलंत ? सोहोनींची आणि आमची केव्हा ओळख करून देणार ?—या महिन्याला त्यांचीच मुलाखत घ्यायची मी ठरविलं आहे !" मी म्हटले.

"नाही; ठरविलंत, ते ठीक केलंत–पण पुन्हा त्याबद्दल आपण काही चौकशी केलीत का ?–ही तुमची काम सांगण्याची पद्धत चांगली आहे–तुमच्या काम सांगण्याच्या या तुफानी वृत्तीमुळे तुम्हांला गरज कितपत आहे हेही आमच्या लक्षात येत नाही !" माधवराव गद्रे म्हणाले.

"वा ! वा ! हे फार चांगलं हं माधवराव, तुमच्याबद्दलच्या खात्रीनं आम्ही बेफिकीर राहतो ! मी जर खरा भाग्यवान् असेन तर माझ्या स्नेह्यासोबत्यांच्या बाबतीत !"

"पण त्यामुळे आम्हांला फार त्रास होतो ना–रंगा सोहनीला मी आज चार दिवस सांगतो आहे, आम्ही तुमच्याकडे येतो म्हणून–पण आपला पत्ता काय ? आणि दुसरं–मी परवा रंगा सोहनीजवळ बोललो: त्याला असली अनौपचारिक मुलाखत आवडेल असं मला वाटलं नाही !"

"अहो आवडेल हो ! त्याला एकदा घेऊन तर या माझ्याकडे !" मी आत्मविश्वासाने म्हटले.

"वा ! वा ! माझ्या ओळखीचा इतका नाही हं फायदा घेऊ देणार ! तुम्ही त्याच्या घरी आलं पाहिजे–तो नाही तुमच्याकडे यायचा ! जसं काही तुम्ही त्याची मुलाखत घेतली नाहीत–तर त्याची मुलाखत कुठे यावचीच नाही !" माधवराव गद्रे.

"—अहो, लाख मुलाखती येतील—पण माझ्या मुलाखतीची मजा येणार आहे का त्यांना ?"

"पुरे पुरे ! मग तुम्ही आपला दुसरा क्रिकेटियर पाहा ! आमचा सोहनी आपणहून तुमच्याकडे कधीच यायचा नाही !" माधवराव गद्रे जरा रुबाबातच म्हणाले.

"ठीक आहे. मग पैज तुमची आमची! मी रंगा सोहनोचींच मुलाखत घेणार—आणि त्याला इथे बोलावून घेणार! माझीही त्यांच्या घरी यायला बिलकूल हरकत नाही—पण ऊन कोण आहे सध्या?"

"—आणि त्याल नाही वाटतं?"

"अहो पण तो तरुण आहे—खेळाडू आहे—पाच पाच तास उन्हात खेळत असतात ते!" माझे आणि गद्रे याचे बोलणे चालले होते—आणि त्यांच्याबरोबर आलेली तो दोन तरुण माणसे थोडी कुचमल्यासारखींच बसली होती. तेव्हा मी म्हटले, "अहो गद्रे, शिष्टाचार विसरलो की आपण दोघेहि —यांची ओळख नाही करून दिलीत—"

माधवराव गद्रे मोठ्यांदा मनमोकळेपणाने हसत म्हणाले, "बरीच लौकर आठवण झाली तुम्हांला—हे भालचंद्र सोहनी—रंगा सोहनीचे वडील भाऊ—आणि हे—" गद्र्यांनी माझ्याकडे मिस्किलपणाने हसत पाहत म्हटले "महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध क्रिकेटियर रंगा सोहनी! बरं आहे जोशीबुवा, आम्ही जातो आता—आम्हांला काम आहे—तुमच्या मुलाखतीत आम्ही कशाला विनाकारण--?" आणि येवढे म्हणून माधवराव गद्रे व भालचंद्र सोहनी माझ्या खोलीतून बाहेर पडले.

"अहो माधवराव-" रंगा सोहनी.

--पण ती दोनही माणसे सायकलस्वार होऊन दिसेनाशी झाली!

रंगा सोहनी आणि मी एकमेकांकडे पाहू लागलो-हसूं लागलो.
—मला वाटले, माझ्या या मुलाखतीची सुरुवात भलतीच अनौपचारिक झाली!

—मी त्या तरुणाकडे किंचित् शंकेखोरपणाने पाहू लागलो, रंगा

सोहनीचा कुठे तरी फोटो पाहिल्याचे मला आठवले आणि नंतर तो फोटो आठवून मी त्या तरुणाकडे पाह्यला लागलो-शंकाच उरली नाही-तो रंगा सोहनीच होता !

मी एकदम त्या तरुणाचा-पण आता तसे कशाला ? रंगा सोहनीचा-हात आपल्या हातात घेत म्हटले,

"हॅलो ऽ ! सोहनी-माझी खूप मजा केलीत बुवा तुम्ही !"

"—आमच्या माधवराव गद्र्यांनी मला सांगितलं-तुम्ही माझी मुलाखत घेणार आहांत—आणि खरं सागू, मला सह्याद्रीत तुम्ही घेतलेल्या तीनही मुलाखती आवडल्या." सोहनींनी आपल्या पद्धतीने सावकाशपणे व धीमेपणाने म्हटले. जणू काय धीमेपणाने ते एकेक धावच काढीत होते.

"माझ्या तिन्ही मुलाखती तुम्हांला आवडल्या ? किती चांगले आहांत हो तुम्ही ? पण सोहनी, तुम्ही असे आपणहून अकल्पित याल—मला या घटनेचा कमालीचा आनंद झाला आहे. पण–" सोहनीचे कौतुक कोणत्या शब्दांनी करावे हे माझे मलाच कळेना ?

"माझी मुलाखत तुम्ही नक्की घ्यायची ठरवलं आहेत हे कळलं मला. बरं, तुमची माझी अद्याप ओळख नाही–तेव्हा कोणी तरी कोणाकडे जायचेच ना ?" मध्येच एखादी 'मेडन' ओव्हर खेळावी त्याप्रमाणे सोहनी मधे एक मिनिटभर नुसतेच हसले—आणि म्हणाले, "तेव्हा मी मनात विचार केला—मी वयाने तुमच्यापेक्षा लहान आहे, तेव्हा आपणच उठून यावं तुमच्याकडे ?'

—आणि नंतर आमचा चहा वगैरे झाला.

"बरं सोहनी, आता एक गंमत दाखवतो तुम्हांला—मी आज उद्याच

तुमच्याकडे येणार होतो. आणि साधारण अदमासाने मी तुमची मुलाखत लिहून ठेविली आहे- ती तुम्हांला वाचून दाखवितो-आणि त्यात प्रत्यक्ष माहितीच्या अभावी जर काही भलतं लिहिलं गेलं असेल तर तेवढं आता तुमच्याकडून बरोबर करून घेतो--"

ते ऐकून सोहनी माझ्याकडे आश्चर्यचकित मुद्रेने पाहू लागले—भेटी आधीच मुलाखत ?

पण मी आपली मनात समजूत करून घेतली की, माझ्या या आगाऊ कर्तबगारीने सोहनींचा माझ्याविषयीचा आदर वाढलाच असला पाहिजे ! —मी मुलाखत वाचू लागलो.

" ... ... ... .... ... .... ... ... .... ... ... ... .... ... ... ....

... .... ... ... ... तो विजयी वीर म्हणजे श्रीरंग सोहनी ! रंगा सोहनी यांचा जन्म .... ... ... रोजी गावी झाला !" मी मध्येच थोडा थांबलो आणि माझ्या खिशातले फाउन्टन पेन काढून हाती घेत रंगा सोहनीना विचारले, "हं सोहनी, सांगा, कोणत्या साली आणि कुठे तुमचा जन्म झाला ? म्हणजे मध्ये सोडलेली तेवढी रिकामी जागा भरून टाकतो !"

"मला वाटतं आपण असं करू—" रंगा सोहनी माझ्याकडे मिस्किल-पणाने पाहत हसत म्हणाले. "मुलाखत एकदा आपण संबंध वाचू आणि मग नंतर सगळ्या गॅप्स् भरू !"

मलाही ती सूचना आवडली. आणि हातातील फाउन्टन पेन टेबलावर ठेवीत मी मुलाखत पुढे वाचू लागलो, "-रंगा सोहनी यांचे बालपण अगदी दारिद्र्यात गेले. ते आपल्या आई-वडिलांना एकुलते एक होते. वडिलांना वाटे, ह्या आपल्या एकुलत्या एक मुलाने नीट अभ्यास करून

लौकरच आपल्या संसाराला हातभार लावावा–पण श्रीरंग सोहनी यांस शाळेत असतानाच चेंडूफळीच्या खेळाचा नाद लागला.

"—पण घरच्या दारिद्र्यामुळे त्यांस चेंडू, बॅट वगैरे सामान कसे मिळणार ?"

"–पण तसल्या अडचणींस लहानग्या श्रीरंगाने बिलकुल जुमानले नाही. त्याने मोडक्या तोडक्या देवदारी फळीचीच बॅट करावी—रॉकेलचा रिकामा जुना डबा स्टंप्स् म्हणून ठेवावा—आणि गल्लीतील चार पोरे जमा करून क्रिकेटचा खेळ खेळावा !

"—आपल्या आई-वडिलांस न जुमानता बिचाऱ्या श्रीरंग सोहनीने आपला नाद टिकविला म्हणूनच महाराष्ट्राला आज शेकडो हमखास धावा काढणारा रंगा सोहनी हा अभिमानास्पद क्रिकेटपटू मिळाला !"

"या उदाहरणावरून आई-वडिलांचे न ऐकणे देशाला किती फायदेशीर ठरते याची बालवाचकांनी मनाशी खूणगाठ बांधावी !"

"—आणि सोहनींच्या राजकोटच्या त्या बिनबाद २१८ धावा !"

सोहनींना मी मुद्दाम विश्वासात घेऊन विचारले, "काहो सोहनी, राजकोटला ज्या आपण दोनशे अठरा धावा काढल्यात त्याचे काही विशेष टेक्निक आहे काय ?"

माझ्या या मार्मिक प्रश्नाने सोहनीही जरा खुलून म्हणाले, "हीच गोष्ट मला जो तो विचारतो; पण मी अद्याप कोणालाही त्याचे उत्तर दिले नाही. अगदी तुम्ही असं समजा की, तुमच्या या मुलाखतीकरिता हा मुद्दा मी राखून ठेविला होता. त्याच असं असतं—"

"बरं-" मी उत्सुकतेने किलकिले डोळे करोत सोहनींकडे पाहू लागलो.

"पण एक करा हं—हे बोलू नका कुणाजवळ—मुलाखतीत छापलंत तरी हरकत नाही-पण बोलू नका कुणाजवळ.—ज्या वेळेला अशा धावा काढायच्या असतील—त्या वेळेला फक्त एक सावधगिरी घ्यायची. औट व्हायचं नाही ! येवढी सावधगिरी घेतली की आपोआप धावा होतात पाहा !"

"अरे वा !" मी खूष होऊन म्हटलें, "पण काय हो सोहनी, ज्या वेळी तुम्ही अशा आणि इतक्या धावा काढता त्या वेळी त्या तुम्ही स्वतः-करिता म्हणून काढता का महाराष्ट्र देशाकरिता म्हणून काढता ?"

यावर सोहनी हसत म्हणाले, "यशवंतराव,-महाराष्ट्र म्हणजे काय तुम्ही एखादा नादारीचा विद्यार्थी समजता काय ?—की त्याला कुणी पुस्तके घेऊन द्यावीत—फी द्यावी आणि त्याच्या नावलौकिकाकरिता कोणी धावही काढून द्याव्यात ?"

"बर, इतक्या धावा त्या सामन्यात तुम्ही काढणार असे तुम्हाला केव्हा वाटले ?"

"अर्थात् धावा काढून झाल्यानंतर !" सोहनी बेगुमानपणाने म्हणाले.

"बरं सोहनी, आता आपलं सहज विचारून ठेवतो—आमच एक काम कराल का ?"

"काय ?"

"माझ्या मुलाला क्रिकेट शिकवाल काय ?"

"जरूर ! काय करतो तुमचा मुलगा ?"

"अगदी हूड आहे तो. शाळेत जात नाही !"

"मग तो क्रिकेटकरिताच जन्माला आला आहे असं तुम्ही समजा ! बरं आता घरात असला तर हाक मारा ना त्याला-फिगर पाहून ठेवलेली असावी !"

"थांबा, घेऊन येतो हं त्याला !" मी म्हटले.

"का, इथून हाक मारून नाही का यायचा तो !"

"हाक मारून येण्याइतका का सीधा मुलगा आहे तो. अहो अजून मुळी सहा महिन्यांचाच आहे !"

"अस्सं ! मग त्याला क्रिकेट शिकवावं असं आताच का वाटायला लागलं तुम्हाला ?"

"त्याची लक्षणं दिसतात ना तशी-आतापासूनच ! अहो, मी परवाच त्याचा फोटो काढला-फोटो काढताना तो काही स्थिर राहीना-तेव्हा त्याने स्वस्थ राहावे म्हणून फोटोग्राफरने त्याच्या हातात छोटा कॅमेरा दिला आणि काय त्याने 'पोजमध्ये कॅमेरा' धरला आहे पाहा ! त्या वेळेला तुमची मुलाखत घ्यायची माझी कल्पना होतीच-तेव्हा मला पटकन् वाटले की स्वतःच सेंचरी काढून स्वतःच त्याचा ऐटीने फोटो घ्यावा-अशा ऐटींत तो बसला आहे !"

सोहनी हसले !-ते तरी दुसरे काय करणार ?

"एवढ्यावरनंच म्हणत नाही हं मी-तो क्रिकेटियर होईल हे मला निराळ्याच मुद्यावरून वाटतं आहे-तेहि तुमची उत्सुकता न वाढविता लगेच तुम्हांला सांगतो-तुमचं नाव 'रंगा' पण लोक लाडात येऊन तुम्हांला 'रंग्या सोहनी' म्हणतातच ना ? तसं माझ्या मुलाचं नाव आहे मनोहर-रंगाचं जसं 'रंग्या' तसे मनोहरचं नेमचं 'मन्या' होतं का नाही

पाहा-तेव्हा ! बरं ते जाऊ द्या. सोहनी. तुम्ही प्रयत्न केला नसेल कधी– पण क्रिकेट खेळताना तुम्हांला कधी काव्यमय कल्पना सुचतात का हो ?'

सोहनी म्हणाले, "कधी कधी सुचतात ! एकदा मला वाटले, क्रिकेटचा खेळ किती तात्त्विक आहे पाहा ! दिवस-रात्रीच्या स्टंप्स् दोन्ही बाजूला ठोकलेल्या आहेत–काळ बोलिंग टाकतो आहे–आणि प्राणिमात्र जितक्या दिवसांच्या धावा जास्त काढता येतील तेवढ्या काढून नंतर स्वर्गरूपी पॅव्हिलियन मध्ये–पण खेळ चालू असतांना अलीकडे तल्या-रखान हकीकत सांगत असतो, त्यालाच फक्त उपमा सांपडली नाही मला !"

"वाः वाः ! सोहनी बरं, क्रिकेटमधली आपली एखादी चमत्कारिक आठवण सांगाल काय ?"

"एक आठवण शाळेतील आहे. कुणाबरोबर तरी आमची मॅच ठरली होती. ती. मॅच थोडीशी चुरशीची होती–आमचा जय व्हावा ही तर माझी इच्छा होतीच; पण माझा वैयक्तिक स्कोअर त्यात जास्त व्हावा ही माझी इच्छा. कुणाच्या सांगण्यावरून ते आता आठवत नाही मला– पण खेळायला जाण्यापूर्वी आम्ही एक दगडाचा म्हसोबा तयार केला आणि त्याच्या शेजारी एक फाटकी वहाण ठेविली आणि त्या म्हसोबाला नवस; केला की, जर माझ्या नेहमीपेक्षा जास्त धावा निघाल्या तर ठीक आहे; नाही तर खेळ संपल्यानंतर या शेजारीं ठेवलेल्या फाटक्या वहाणेनं मारीन तुला–अन् झालं–त्या मॅचमध्ये माझ्या खूप धावा निघाल्या–अन् पुन्हा येऊन पाहतो तो–तो म्हसोबा आणि ती वहाण जाग्यावर नाही ! आणि तेव्हापासून आतापर्यंत मी खेळायला लागलो की त्या म्हसोबाची आणि फाटक्या वहाणेची आठवण होते मला–आणि चिक्कार धावा काढतो मी !"

"आणि दुसरी आठवण ?"

"परवा कोल्हापूरला आमची मॅच झाली. तेव्हां विनोदमूर्ती दामुअण्णांच्या हस्ते माझा गौरव झाला—आणि नंतर खेळताना विनोदमूर्तींचे ते विनोदी डोळे सारखे माझ्यासमोर दिसायला लागले आणि आश्चर्याची आणि कौतुकाची गोष्ट-ती मॅच आम्ही हरलो !"

* * *

—पण माझ्या या मुलाखत वाचनाने सोहनींचे काही तरी मानसिक हाल होत असावेत, असे मला वाटले; म्हणून मी त्यांच्याकडे सहानुभूतीने पाहिले. तोच सोहनी म्हणाले, "असं करा यशवंतराव, पुढची मुलाखत मी आपल्या मनातल्या मनात वाचतो !"

मी मुकाट्याने मुलाखतीचे हस्तलिखित सोहनींच्या हाती दिले. त्यांनीही ते झटकन् वाचून संपविले व एक सुटकेचा निःश्वास टाकला !

मी अधिरेपणाने विचारले, 'कसं काय, बरोबर आहे ना ?"

मी लिहिलेल्या मुलाखतीचे हस्तलिखित एका मोठ्या अवजड पुस्तकाखाली दडपून ठेवीत सोहनी म्हणाले, "यशवंतराव, माझा तुमच्याबद्दल तुम्ही सनातनी आहांत असा गैरसमज होता—पण तो या मुलाखत वाचनाने दूर झाला ! तुम्ही पक्के समाजवादी दिसता !"

"कशावरनं ?', मी घाबरत विचारले.

"कलावंत किंवा खेळाडू हा दारिद्र्यातूनच निर्माण होतो. श्रीमंत माणसे चांगली असूं शकत नाहीत, असे तुम्हांस वाटते की काय ?"

"असे कशावरून म्हणता तुम्ही ?" मी थोडे चिडूनच विचारले.

"याचं कारण असं की, मी गरीब पोरगा कधीच नव्हतो आणि नाही! माझे वडील इंजिनियर आहेत !"

"बऽरं !"

"—आणि त्यांना मी एकुलता एकही नाही, आम्ही एकंदर चौघे आहोंत !"

"बरं. तुमची आई मात्र तुमच्या या खेळाचं मनमोकळं कौतुक करीत असे—असे जें मी लिहिले आहे—निदान तो मुद्दा तरी—?"

"—माझी आई मी सात वर्षांचा असतानाच वारली ! पण येवढं थोडं थोडं कशाला ? तुम्ही लिहिलेल्या या माझ्या मुलाखतीत फक्त माझं नावच तेवढे बरोबर आहे !"

मी एकदम 'बोल्ड' गेलो !

मग आम्ही आमच्या मुलाखतीची दुसरी इनिंग सुरू केली.

"बरं सोहनी, मला तुम्ही असं सांगा, क्रिकेटच्या नादापायी तुमच्या अभ्यासाची काही वर्षे फुकट गेली का ?"

"होय, पण शाळेत असताना नाही गेली ! क्रिकेटच्या खेळामुळे माझे कॉलेजचे आयुष्य फक्त दोन वर्षांनी वाढले !"

"त्यामुळे आपल्या वडिलांचा आपल्यावर राग झाला का ?"

"तोच तर मोठा राग येण्यासारखा विषय आहे माझ्या आयुष्यात ! माझे वडील भयंकर धीमे आहेत. त्यांनी माझ्या क्रिकेटच्या खेळाबद्दल कधी तक्रार केली नाही किंवा रागही दर्शविला नाही ! आणि चांगला खेळू लागलो तरी कधी तोंडातून स्तुतीचा शब्दही काढला नाही ! परवा-चीच गोष्ट सांगतो तुम्हाला. २१८ बिनबाद धावा काढून मी राजकोटहून

आलो—माझे वडील सध्या मुंबईला असतात—येताना तिथे उतरलो—शेजारीपाजारी माझ्या या विक्रमाबद्दल माझ्या वडिलांजवळ पेढे मागत होते.

—माझ्याकडे पाहत आमच्या काकांनी पितृत्वाच्या शिगोशिग गंभीरपणाने म्हटले 'यांनी तिकडे धावा काढायच्या आणि इकडे मला त्रास–पेढे वाटण्यात किती जास्त खर्चं होतो अलीकडे !'–संपले. यात स्तुती समजा नाही तर निंदा समजा !

"सोहनी, मला वाटतं, हेच बरोबर आहे ! निदान माझ्या मनोवृत्तींशी ते जमते आहे. म्हणून तरी मी तुमच्या वडिलांचे अभिनंदन करतो ! नेमलेल्या पुस्तकाबरोबर त्या पुस्तकांच्या "टिप्पणी" ची पुस्तके फुकट वाटावीत त्याप्रमाणे तुम्हांला असं का वाटतं की तुमच्यासारख्या मुलांची स्तुती तुमच्या वडिलांनीच करीत सुटावी ?"

सोहनी गुळमुळीत हसत म्हणले, "मला काहीच वाटत नाही हो—वस्तुस्थिती काय आहे ती सांगितली तुम्हांला !"

"बरं सोहनी, मला तुम्ही असं सांगा—क्रिकेट क्षेत्रात आता तुमच्या महत्त्वाकांक्षा तरी काय आहेत ?"

"मी महत्त्वाकांक्षा म्हणत नाही त्यांना···पण दोन गंमती व्हाव्यात असं वाटतं मला ! एक असं वाटतं—आपली सबंध टीम उत्कृष्ट खेळावी-आणि त्यात आपण पहिल्याच चेंडूला बोल्ड जावं ! आणि दुसरं—" आपल्या कोटावरील क्वचित् कुठे वाटणारा धुरळा टिचकीने झाडीत व खिडकीवाटे बाहेर पाहत सोहनी म्हणाले—"पहिल्या जोडीत खेळायला

जाऊन नाबाद म्हणून शेवटी परत यावं—माझ्या क्रिकेटच्या आयुष्याचं 'यंत्र' आहे असा गैरसमज होऊ नये, ही त्यातली गंमतीची इच्छा !"

—सोहनींच्या या उद्‌गारांनी मला त्यांचे जास्तच कौतुक वाटू लागले. सोहनींच्याबद्दल मी माझ्या मनात एक कल्पना करून घेतली होती की, हा आता "बनेलो माल" झाला असेल. पण उमलत्या फुलाकडे पाहत बसावे असं आपल्या आयुष्याकडे संथ पाहणारा तो एक अभिमानास्पद तरुण वाटला मला !

मला वाटले होते की, सोहनींकडून माझ्या प्रश्नांची उत्तरे परिणामावरून नंतर लिहिलेल्या नाटकातील नायकाप्रमाणे बेछूट येतील; पण तसें झाले नाही !

—सोहनींचा आणि माझा परिचय किती दाट आहे हे मुलाखतीच्या सुरुवातीवरूनच वाचकांच्या लक्षात आले असेल ! पण मनोविश्लेषण वगैरे भानगडीने सांगत नाही—माझा आजपर्यंतचा अनुभव आहे—पहिल्या भेटीत एखाद्या माणसाबद्दल जे माझे मत होते ते नंतर मला सहसा बदलावे लागत नाही !

—सोहनींच्या आयुष्याबद्दल जास्त काय सांगू ? आणि पहिल्याच भेटीत विचारू तरी कसे ? पण श्री सोहनी हे जरी एका क्षेत्रात आज नावलौकिकाला चढले असले तरी जीवितात त्यांचे स्थान अजून ठरायचे आहे ! उपमेत सांगायचे झाले तर त्यांच्या आयुष्याचा भोवतालचा बागबगीचा तयार झाला आहे—मधली इमारत अजून बांधली जायची आहे !

—आणि मोठ्या वयाची एक भयंकर खोड असते. स्तुतीपेक्षा

शुभेच्छा किंवा आशीर्वाद हे तोंडून अगोदर उमटतात ! सोहनींच्या बाबतीत माझी तीच गत झाली आहे.

"काहो सोहनी, आपली ही मुलाखत अनौपचारिक आहे, हे आपल्या लक्षात असेलच ?"

सोहनी उत्तर देण्याच्या भानगडीत न पडता संमतिदर्शक नुसतेच हसले !

"आपल्यावर कोणी काही प्रेम वगैरे ?"

सोहनी एकदम गंभीर झाले आणि ताठपणाने माझ्याकडे पाहत म्हणाले, 'अद्याप नाही !'

—"आपल्याला खोटं वाटतं बुवा! इतक्या बाउंड्ऱ्या, इतका स्कोअर–ते राजकोट—तो लाँग स्टँड—बरं, कादंबरीनायकाला शोभावं असं शरीरसौष्ठव—"

सोहनींनी तरीही किंचित् हसत नकारदर्शक मान हलविली.

"आपल्याला खरं वाटत नाही बुवा !" मी आपली विडी पेटविली.

थोडेसे विचार केल्यासारखे करून सोहनी म्हणाले, "त्याचं कदाचित् असं असेल यशवंतराव, प्रेम करायला जेवढा कादंबऱ्यांतून स्कोअर करावा लागतो, त्यापेक्षा माझ्या स्कोअरचा कदाचित् ओव्हरडोस झाला असेल ! पण आमच्या तल्यारखानसारखं सांगतो—टेक माय वर्ड फॉर इट--आत्तापर्यंत काही नाही ! अगदी विदाउट दी शॅडो ऑफ ए डाऊट !"

"म्हणजे—" मी सचिंतपणाने म्हटले, "आम्ही कलात्मक वाङ्मय लिहितो ते तरी खोटं असलं पाहिजे—किंवा तुम्ही तरी—"

"निदान मी तरी तुमचं प्रेमळ वाङ्‌मय खोटं ठरविलं आहे पाहा ! पण एक सांगतो यशवतराव—तसं काही व्हावं अशी माझी अपेक्षाही नव्हती हं—तुम्ही कबूल करू नका—पण वाङ्‌मयच खोटं—स्वप्नाळू-झोपाळू !"

"तसं नाही सोहनी. असं वाङ्‌मय लिहिण्यातला आमचा उच्च हेतू लक्षात येत नाही तुमच्या ! वाचकांचं मन हुळहुळं व्हावं एवढ्याकरिता आम्ही असं मुद्दाम लिहितो—'तिने उसासे टाकले'—'ती भारली गेली'—'तिने आपल्या पंचप्राणांची पचारती ओवाळली'—लोकांना—तरुणांना--भावी पिढीला धाडस करायचा धीर व्हावा एवढ्याकरिता आम्ही सद्‌बुद्धीने आमच्या वाङ्‌मयातून प्रेमाची लालूच दाखवितो !"

"मग तुमच्यापेक्षा-म्हणजे तुम्हां सर्व साहित्यिकांपेक्षा आमचा तल्यारखान फार श्रेष्ठ दर्जाचा म्हटला पाहिजे ! नो-'ती !' नो—'पदर !' नो—'पिना', 'फेस पावडर'—स्टिल—'सोहनी गेट्स मॅजिक थ्री फिगर्स'—'सोहनी बोल्ड फाइव्ह' 'फिफ्टी इअर्स ओल्ड् यंग व्हेटरन'—असले खणखणीत बडबडून तो पोराबाळांपासून म्हाताऱ्या कोताऱ्यांपर्यंत रेडिओभोंवती गोळा करतो—आणि तुमचे वाङ्‌मय लोकांनी आवडीने एवढ्याकरिता तुम्हांला पोरीबाळींच्या पदरांची वर्णने करावी लागतात !" —मी चलाखीने तो मुद्दा चाळवला.

खरंच सोहनी—मला क्रिकेटची काहीच माहिती नाही-ते तुमचे लाँग ऑन—मिड ऑफ्—मिड ऑन फक्त ऐकून माहिती आहे-खेळाडू औट होण्याचे किती प्रकार असतात हो ?"

"रन् आऊट—बोल्ड, कॉट वगैरे ?"

"त्या सर्व तऱ्हेने तुम्ही बाद झाला आहात काय ?"

"होय, फक्त 'सेल्फ आऊट' म्हणून एक प्रकार आहे, तेवढा अद्याप मी हाताळला नाही—बरं जातो आता–हो, पण गेल्या मुलाखतीत श्री. सदू गोडबोल्यांनी तुमच्या गळ्यात संदेश बांधला—मी आता तुमच्या-जवळ संदेश मागतो--पण संदेशही अनौपचारिकच द्या !"

"संदेश--?" मी.

"येस् ! उगाचच एक गंमत म्हणून ! परवाची एक गंमत सांगायची राहिली तुम्हांला, अहमदाबादला मी जवळजवळ एक हजार ऑटोग्राफ्स् दिले--कागदांच्या तुकड्यावर-आणि दुसऱ्या दिवशीं सहज रस्त्यात फिरताना त्यांतले पाच सहा-माझे मलाच परत सांपडले !"

"मग त्याचं काय केलंत तुम्ही ?"

"खिशात जपून ठेवले आहेत ! आता कुणी मागायला आला तर पहिल्यांदा तेच वाटणार आहे !—आता मला हे कबूल आहे की, तो एक क्षणाचा आदराचा उन्माद असतो--पण तरीही तुमचा मला संदेश पाहिजे आहे !"

"संदेश एकच सोहनी ! तो तुम्ही कोणत्याही अर्थानें घ्या—इतर सर्व तऱ्हेनें औट होण्यात नामुष्की नाही — पण फक्त 'सेल्फ आऊट' होऊ नका !" संदेश स्वीकारल्याचे चिन्ह म्हणून सोहनींनी उभें राहून मान लववली व लगेंच ताठ होऊन आपल्या खिशातील एक कागद काढून तो माझ्या टेबलावर ठेवीत सोहनी उद्गारले, "इन रिटर्न हियर इज माय ऑटोग्राफ !

— रंगा सोहनी

* * *

## भाई ना. ग. गोरे : : : ६

या महिन्याकरिता मी श्री. के. ना. काळे यांची मुलाखत घ्यायची ठरविले होते. पण त्या मुलाखतीबद्दल काही लोकांची विशेष उत्कंठा दिसल्यामुळे, जमली तर ती उत्कंठा आणखी वाढवावी या सद्हेतूने प्रेरित होऊन, श्री. के. ना. काळे यांस मी या महिन्यापुरते बाजूला सारले आहे. आणि शिवाय के. ना. काळे यांची मुलाखत "विचारप्रवर्तक आणि मार्गदर्शक" करण्याच्या मी खटपटीत असल्यामुळे हा विलंब क्षम्य ठरेल !

तेव्हा आता या महिन्याला कुणाची मुलाखत घ्यावी हा माझ्यापुढे प्रश्न पडला. तेव्हा मी असे ठरविले की—सकाळी उठून आपल्या दरवाज्यात उभे राहायचे—आणि जो आपल्या ओळखीचा पहिल्यांदा भेटेल, त्याची मुलाखत या महिन्याकरिता घ्यायची !

आणि त्या पूर्वसंकल्पाप्रमाणे मी सकाळी उठून मुलाखतीच्या आशेने दरवाज्यात उभा राहिलो.

—पाहिल्यांदा आली आमची नेहमीची भाजीवाली !

—मग आली फुलाचा पुडा टाकणारी माळीण !

—मग आला छापखान्यातील माणूस प्रुफे नेण्याकरिता !

—मनात आले होते की यांपैकीच कोणाला तरी मुलाखतीकरिता वेठीला धरावे. पण—

खरंच, काय हरकत होती त्यांपैकी एखाद्याची मी मुलाखत घेतली असती तर ?

—ते का जीवन जगत नाहीत ?–का आपल्या आयुष्यातील अडचणी बाजूला सारीत नाहीत ?

—का त्यांना महत्त्वाकांक्षा नसतील ?—फार तर त्यांच्या आयुष्यात दारुण मनोभंग असतील !

—निर्मूल झालेल्या महत्त्वाकांक्षा असतील ! त्यांच्या आयुष्याची दारुण सर्कस असेल ! पण–हो–मुलाखतीच्या पंपाने उद्योग, उत्साह आणि कर्तबगारीची हवा भरायची असते नाही का जनमनात ?—तेव्हा असली एखादी मुलाखत मी घेतली असती, तर ती लोकांना पालीच्या चुकचुकण्यासारखी वाटली असती !

"अहो गोरे, शुकऽशुकऽऽ, इकडे-इकडे मी हाक मारतो आहे !" मी ओरडलो.

"का हो ? येतो थोड्या वेळात—जरा मंडईत जाऊन येतो !" गोरे लांबूनच म्हणाले.

"नाही; अगोदर इकडे या–एक महत्त्वाचं काम आहे !"

गोरे हसत हसतच माझ्याकडे आले, "का हो, इतक्या निकडीचे काय काम आहे ?"

"अगोदर बसा तर खरं-आज तारीख दहा-'सह्याद्री'ची मुलाखत द्यायची आहे—तेव्हा तुम्हांला थोडा त्रास." मी श्री. गोरे यांना माझ्या मुलाखतींची हस्तलिखितं अगोदर वाचून दाखवीत असे.

"त्रास कसला त्यात ? वाचा की-या महिन्याला कुणाला वेठीला धरला आहेत बुवा ?" गोरे खुर्चीवर जरा ऐसपैस बसत म्हणाले.

"या महिन्याला तुमचीच मुलाखत घ्यायचं ठरवलं आहे मी ! फार त्रास देत नाही तुम्हाला. झटकन् संपवतो." मी घिसाडघाईने म्हटले.

गोरे माझ्यापुढे हात जोडीत उभे राहत म्हणाले, "भाई माफ कर. मला मंडईत जायचं आहे अगोदर !"

"-गोरे-"मी कळवळून म्हटले "तुमच्यासारख्यांनी असं म्हटल्यानंतर आम्ही काय करायचं ? विश्वकुटुंबवादी गोरे, जीवनाकडे जरा व्यापक दृष्टीने पाहा ! मंडई आणि मुलाखत- मंडईने फार तर तुमच्या खासगी जीवनावर परिणाम होईल-पण मुलाखतीने उभ्या महाराष्ट्राचा फायदा होईल.

गोरे माझ्याकडे मिस्किलपणाने पाहत म्हणाले, "अहो, आमची शुभा * हट्टून बसली आहे—तिला मी आत्ता अंजीर आणून द्यायचं कबूल केले आहे !"

---

* शुभा हे गोरे यांच्या पत्नीचे नाव नव्हे ! शुभा हे त्यांच्या मुलीचे नाव आहे. मी त्यांच्याकडे नेहमी जातो, पण त्यांनी आपल्या पत्नीना नाव घेत हाक मारलेली मी ऐकलेले नाही; त्यावरून ते माझ्यासारखेच प्रतिगामी असावेत असा मला संशय आहे !

"ठीक आहे-माझ्याही छोकरीला मला आत्ता एक पिपाणी आणून द्यायची आहे-पण आपण आपल्या जोवनात आता जरा उन्नत होऊ या- आणि पहिल्यांदा मुलाखत संपवून मग मंडईत जाऊ या !"

मी टेबलावर गंभीरपणाने बसून लिहिण्याचे अवसान आणले. कोरे कागद पुढे घेतले—बिचारी शाई आणि टाक सत्याग्रहाला सदैव तयार असलेल्या देशभक्ताप्रमाणे माझ्या शिक्षेचीच वाट पाहत होती—

गोरे यांनी मनात जाणलेच की आता मुलाखतीशिवाय सुटका नाही ! त्यांच्यावर मी हा माझ्या सोयीकरिता मुलाखतीचा अत्याचारच करीत होतो.

पण मी मनात विचार केला.

—ज्या मुलाखती नेहमी मासिकात येतात तो सुद्धा एक प्रकारचा सात्त्विक अत्याचारच नसतो का ? मुलाखतीकरिता दाराशी माणूस आला-नाही कसे म्हणायचे ? मुलाखतीला नाही म्हटले तर आपणच आपली किमत कमी केल्यासारखे होते-आणि हो म्हणावे तर-

—बरोबरीची कुस्ती लढून आपल्याच दोस्ताच्या खांद्यावर बसून "कुस्ती मारली की जय !" अशा थाटात कलाकौतुकात मुलाखत येते !

गोरेही माझ्या मुलाखतीच्या कल्पनेने पेचात पडलेले दिसले.

मी म्हटले "गोरे—डोकं दुखतं आहे म्हणून सांगितलंत तरी आता मुलाखतीशिवाय सुटका नाही !"

"आपली दोस्ती बाधणार म्हणायची आम्हांला ? बरं, मग मी इंग्रजी चौथीत असतांना एक काव्यमय सूत्रवाक्य तयार केलं होतं ते घ्या मुलाखतीच्या सुरुवातीला :

जो करीना 'वर्क'।
त्याचा कधी न होई 'एडमंड बर्क' ॥

गोरे हसत हसत म्हणाले. मीही हसत हसतच ते इंग्रजी चौथ्या इयत्तेतील गोऱ्यांचे सूत्रवाक्य टिपून घेतले.

नंतर श्री. गोरे गंभीर होत म्हणाले, "आता माझी मुलाखतीवाचून सुटका नाही हे मी जाणलेच आहे. तेव्हा आता तुमचीआमची वैचारिक मुलाखत होऊन जाऊ द्या ! नाही तर मी माझ्या पत्नीशी कसा वागतो ?-त्यांचे माझ्यावर किती प्रेम आहे ?-असले घरगुती विषय माझ्या मुलाखतीत नकोत ! कारण-समजा, मी पुढे आत्मचरित्र लिहिण्याइतका मोठा झालो तर त्याच्या सामग्रीची आतापासून परिस्फुटता नको ! काही तरी-वैचारिक मुलाखत होऊन जाऊ द्या !."

मीही श्री. गोऱ्यांचा तो मुद्दा एकदम मान्य केला आणि गंभीरपणाने म्हटले, "ठीक आहे. तशीही मुलाखत घ्यायची आपली तयारी आहे. पण विषय मात्र राजकारणाचा नको. कारण राजकारणात तुमचे-आमचे बिलकूल जमायचे नाही ! आणि राजकीय स्वरूपाची मी जर तुमच्याशी प्रश्नोत्तरे करायला लागलो तर तुमचा माझ्यापुढे निभाव लागणे कठीण आहे !

—त्याचे मूळ महत्त्वाचे कारण असे आहे की-मला राजकारणात अजून फारसे काही कळत नाही ! अजून सर्वांचे ध्येय एक असताना राजकारणात पक्षोपपक्ष-निदान त्यांतील एकमेकांबद्दलचा इतका कडवटपणा-असावाच का, या प्राथमिक प्रश्नाच्या आश्चर्यात आणि भ्रमातच मी दंग आहे !"

"ठीक आहे ! मग सध्या वाङ्मयात बौद्धिक अराजक माजले आहे-

त्यावर आपण मुलाखतीच्या रूपाने दोन हात करू !" गोरे गंभीरपणाने म्हणाले.

"पण तत्पूर्वी भाई गोरे, मला असं सांगा—की माझ्या वाङ्मयाबद्दल आपणांस कितपत आदर आहे ? आणि असल्यास वजनमाप पद्धतीने किंवा तुलनात्मक पद्धतीने आपण त्या आदराची महती गाऊ शकाल काय ?" मी मुद्दामच विचारले.

"जोशीबुवा, वाङ्मयात आपण इतक्या तऱ्हेने हालचाल करीत आहांत की तुमच्याबद्दल आदर ठेवण्याशिवाय कोणालाच गत्यंतर नाही ! स्वतः तुमचे लेखन जरी प्रतिगामी असले–" मध्येच एकदम एक निःश्वास टाकून श्री. गोरे म्हणाले, "असो बिचारं प्रतिगामी !—पण चित्तरंजनमालेच्या रहस्यमय डिटेक्टिव्ह कादंबऱ्यांपासून तो तहत् वादविवेचनमालेपर्यंत इतके नानाविध तुम्ही प्रकाशन केले आहे की, त्या प्रकाशनाचे एकत्रित सामर्थ्य डोळ्यांपुढे आणून तुम्ही प्रकाशकस्वरूपी टॉलस्टॉय, मार्क्स किंवा एंजल्स आहांत असे कोणीही विनोदानं म्हणू शकेल ! निदान मला तरी तसे चेष्टेने म्हणायला बिलकूल दिक्कत वाटत नाही !" गोरे एकदम साध्या बोलण्यावरून व्यासपीठावरून बोलल्यासारखे बोलू लागले.

तेव्हा मी पुढील अडचण ओळखून पाण्याचे तांब्याभांडे व खडी-साखरेचे खडे आणून त्यांच्यापुढे ठेविले. त्यांतील एक खडीसाखरेचा खडा तोंडात टाकीत गोरे गंभीरपणाने म्हणाले, "खडीसाखरेबरोबर चार बदामबियाही असल्या तर चालतील जोशीबुवा !"

"द्यायला काही हरकत नाही माझी-पण मी आपणांस आत्ता माझ्या घरतून बदामबिया आणून दिल्या तर मला आपण कदाचित् भांडवलवाले

समजाल अशी धास्ती वाटते आहे ! तेव्हा मी आपणांस बदामबिया देतो-पण एका अटीवर-आपण त्या चुरमुरे म्हणून खात असाल तरच !"

—आणि मी श्री. गोऱ्यांना बदामबिया आणून दिल्या. समतेच्या तत्त्वानुसार त्यांतील निम्म्या त्यांनी घेतल्या आणि त्याच्या बदला त्यांनी आपल्या-जवळची निम्मी खडीसाखर मला दिली !

—आणि नंतर खडीसाखर आणि बदामबिया खात खात आम्ही बोलू लागलो.

"हं—बोला आता माझ्या वाङ्मयाबद्दल आपले मत—"

"चविष्ट आहे—!" आपल्या डोक्यावरची खादी टोपी जरा मागे सारीत गोरे म्हणाले.

"—बदाम-खडीसाखरेबद्दल नाही मी आपले मत विचारले. माझं वाङ्मय—" मी स्पष्ट खुलाशाच्या अपेक्षेने विचारले.

"तुमचं वाङ्मय म्हणजे तुम्ही असं समजा जोशीबुवा की—

कालिदास + ज्ञानेश्वर + भवभूती + रवींद्रनाथ टागोर उणे फडके + खांडेकर + माडखोलकर + ना. वि. कुलकर्णी" मध्येच एक पेलाभर पाणी पिऊन गोरे पुढे म्हणाले, "किंवा टॉलस्टॉय + रोमाँ रोलाँ + जॉन गंथर + गॉर्की + शॉ ÷ त्या नावावर विकले जाणारे आपल्या-कडील सर्व लोक !" गोरे आपल्या विशिष्ट पद्धतीने गालाला खळी पाडून हसू लागले.

आणि ते ऐकून मी तळमजल्यावर असतानाच मला एकदम तिसऱ्या मजल्यावर गेल्यासारखें वाटू लागले—आणि गोरे मात्र तळमजल्यावरूनच

माझ्याशी मान वर करून तिष्ठत बोलत उभे राहिले आहेत असे मला वाटले.

आणि मग मी श्री. गोऱ्यांशी जरा थोड्या उमेंटपणानेच पण अधिकार-युक्त स्वरात बोलू लागलो.

"गोरे—कलेकरिता कला का जीवनाकरिता कला याबद्दल आपले स्पष्ट मत काय आहे ?"

"चिवड्यावर लिंबू पिळायचे का लिंबाच्या रसात चिवडा टाकायचा या महत्त्वाच्या विषयावर घुमविलेला वादविवाद म्हणजे कलेकरिता कला का जीवनाकरिता कला हा वाद ! किंवा शरीराकरिता आत्मा का आत्म्याकरिता शरीर किंवा—"

"गोरे, थांबा; उपमा लांबवू नका—जरा चिवड्यापाशीच थांबा; मला एक शंका विचारायची आहे. समजा, आपण आज चिवडा खाल्ला आणि उद्या तोंडात लिंबू पिळले किंवा आज लिंबू चोखून उद्या चिवडा खाल्ला–तर कला आणि जीवन एक होतील काय ?"

मंडईची पिशवी मांडीवर घेत गोरे म्हणाले, "मला मंडईला जायला उशीर होतो आहे !"

"बरं, आपल्याकडे काही लोकांना शॉ--इब्सेन--टॉलस्टॉय वगैरे म्हटले जाते त्याबद्दल आपले काय मत आहे ?"—य. गो. जोशी यांनी, अर्थात् मी, विचारले.

"जोशीबुवा, मला मंडईत जायला उशीर होतो आहे. आणि त्या घाईत आपण जर असले महत्त्वाचे प्रश्न मला विचारू लागलात तर मी भयंकर स्पष्ट उत्तरे देऊन मुलाखत अशक्य करून टाकीन ! आपल्याकडे जे कोणी

शॉं-इब्सेन-टॉलस्टॉय असतील ते असेनात बिचारे आपआपल्या घरीं सुखरूप ! धुळवडीच्या दिवशी काही लोक अंगावर रंगीबेरंगी पट्टे ओढून व चित्रविचित्र पोशाख करून आपल्या पूर्वजांसारखे ओरडत खेळ म्हणून उन्हाचे हिंडतात, आणि उन्हाचे चटके बसू नयेत म्हणून त्या वेळी डोक्यावर साहेबाची टोपी घालतात–त्या साहेबाच्या टोपीसारख्याच आपल्या लेखकांच्या शॉ-इब्सेन-टॉलस्टॉय इत्यादी पदव्या वाटतात मला !" गोऱ्यांना काय वाटले कुणाला ठाऊक त्यांनी आपल्या हातातील मंडईची पिशवी खुर्चीच्या टोकाला अडकविली आणि खुर्चीवर ते ऐसपैस बसले.

"पण त्यामुळे माझी काय अडचण होते माहीत आहे तुम्हांला ? परिस्थितीमुळे माझे विद्वान व्हायचे राहून गेले आहे. तेव्हा मी टॉलस्टॉय, शॉ वाचलेला नाही—पण काही लोकांच्या बोलण्यावरून त्या लेखकांबद्दल मला आदर आहे. पण आपल्याकडील ज्या लोकांना अशा पदव्या बहाल केल्या जातात त्यांचं वाङ्मय मी वाचलेलं असतं—आणि ते वाचून मूळ टॉलस्टॉय, शॉ इत्यादींबद्दलचा माझा आदर ढासळत जातो !"

—आणि एकदम काय झाले ?

—आपण हसत खिदळत रस्त्याने गप्पा मारीत जात असावे आणि त्याच वेळीं पांढऱ्याशुभ्र फडक्यात गुंडाळून एखाद्या लहान मुलाचे प्रेत कुणीतरी आपल्या शेजारून न्यावे; झटकन् आपली थट्टा थंडावते–जिभा लुळ्या पडतात–आणि आपण थोडेसे गांगरतो. त्याप्रमाणे माझ्या खोलीतील एका छापील पुस्तकाच्या दर्शनाने श्री. गोऱ्यांची स्थिती झाली.

—ते एकदम गंभीरपणाने मी काही एक प्रश्न न विचारताच म्हणाले, "कुस्तीमध्ये एखाद्या पैलवानाचा हात उखडावा त्याप्रमाणे जीवनकलहात मध्यमवर्गाची स्थिती झाली आहे ! आणि आपले लेखक सगळे मध्यम-

वर्गीयच आहेत ! आर्थिक अनवस्थेच्या मागोमाग सर्व प्रकारची अनवस्था आली आणि त्यामुळे भांबावून जाऊन आम्ही चारी दिशांना उधळतो आहोत—आणि आपल्यांतील लेखक तर उधळलेही आहेत आणि पिसाळलेही आहेत !

—महायुद्धाच्या भयंकर दिव्यातून गेल्यानंतर व सुबत्ता आणि विपन्नावस्था यांचे झोके एका मागोमाग झपाट्याने बसल्यानंतर पाश्चात्य देशांतून राजकारणात काय अथवा समाजकारणात काय, जशी निर्नायकी माजली आणि पूर्वीची समाजबंधने नष्ट होऊन त्यांच्या जागी नवी बंधने न आल्यामुळे जशी तिकडे बजबजपुरी माजली, त्याचीच अल्पप्रमाणात आपल्याकडे पुनरावृत्ति आली ! ही निर्नायकी म्हणजे बुद्धिस्वातंत्र्य ! हे अराजक म्हणजे लोकशाही ! नवमतवाद म्हणजे नवी स्मृती ! हा उल्लूपणा म्हणजे क्रांती ! अशी आत्मवंचना घडून आली व आमचेही साहित्यिक त्यात वाहून बुडून रंगून गेले !

प्रवाहाच्या जोराने आपले साहित्यिक खाली खाली खेचले जात होते व आहेत—आणि एकीकडे ओरडत होते आणि आहेत की, आम्ही पोहत आहोत !

भोवऱ्यात सापडून बुडत चालले आहेत–पण तोंडाने म्हणत होते व आहेत की आम्ही मुद्दाम तळाशी जात आहोत — आणि पुरते तळाशी गेलो की तेथून एकदम हाराभर मोत्ये घेऊन आम्ही वर येणार आहोत !

प्रवाहपतित असता आपले साहित्यिक प्रेषिताचा आव आणीत होते व आहेत !"

मी खाली मान घालून मुकाट्याने श्री. गोरे बोलत होते ते लिहून घेत

होतो. श्री. गोरे आता मंडईची आठवण विसरले होते. ते आता विचाराच्या धारेला लागले होते.

"—ही साहित्यातील बुवाबाजी होती व आहे! खोटे आणि भोंदू संत ज्याप्रमाणें मुद्याचा प्रश्न टाळतात अथवा त्यावर उत्तरे देऊ लागले की जसे हास्यास्पद ठरतात—बिकट अवस्थेतून पार पडून हिमतीने नवी समाजरचना, नवी समाजबंधने निर्माण करण्यासाठी जो विशाल अनुभव व बुद्धी लागते ती आपल्या ललित लेखकांजवळ नव्हती आणि नाही!

—'ब्रह्मचारी' बोलपटातील मीनाक्षी गुडघाभर पाण्याला तलाव समजून त्यात पोहण्याचा जसा आव आणते--तसेच आपले साहित्यिक आपल्याभोवतालच्या टीचभर समाजाला सर्व समाज कल्पून—त्याच समाजावर आपल्या बुद्धिमत्तेची चिखलफेक करीत आहेत!

—आणि शरमेची गोष्ट—त्याच वाङ्मयाला पुरोगामी क्रांतिकारक-क्रांतिवादी वाङ्मय म्हणत आहेत व म्हणवून घेत आहेत.

—नवमतवादी ही शिवी झाली आहे–आणि याला नवमतावादी आणि पुरोगामी लेखकच कारण आहेत! नवमतावदी हा ईश्वर अमान्य करणारा आहे—आणि जो ईश्वर अमान्य करतो, तो तर अधिकच पापभीरू कर्तव्यदक्ष–न्यायनिष्ठ–आणि त्यागी असायला पाहिजे असं मला वाटतं!

—बाप मेल्यामुळे हातीं आलेल्या बापकमाईच्या—किंवा पिढीजात पैशावर उंडारणाऱ्या पोरांसारखे या लेखकांकडे पाहून वाटते!

—समाजाची गती नियंत्रण करण्याची शक्ती व जबाबदारी माणसांवर आहे!

—ईश्वराला ज्यांनी पदच्युत केले, त्यांनी ईश्वराच्या जागी मानव-

धर्माला अभिषिक्त केले पाहिजे ! तसे घडले असते, तर माडखोलकर म्हणतात त्याप्रमाणे बौद्धिक अराजक माजण्याचे कारणच नव्हते !

—लोकमान्य टिळक आणि गांधी यांच्यासारखा नेता नाही, म्हणून ही अंदाधुंदी माजली आहे असे बोलणे हे बुद्धिहीनांना शोभते !

—बुद्धिवानांना शोभणार नाही !

—ध्येयमूर्तीची निर्गुण उपासना आम्हांला का साधू नये ?

पण खरं बोलायचं, तर ही माणसं लेखनाच्या बाबतीत प्रामाणिक आहेत, हेच मला पटत नाही ! शील आणि कार्यक्षमता यांचा अत्यंत घनिष्ठ संबंध आहे !

सोव्हिएट राज्यसत्ता प्रस्थापित झाल्यानंतर नवमतवाद्यांच्या पेंढाऱ्यांनी रशियातदेखील दंगल उडविली होती ! आणि आपल्याकडे काही न होताच वाङ्मय-पेंढारी मोकळे सुटले आहेत ! त्या रशियन पेंढाऱ्यांबद्दल लेनिन ने किती कठोर उद्गार काढले आहेत ! 'उष्टया पेल्याचा' लेनिनने दिलेला दृष्टान्त त्या कालाचाच आहे !

—मी तुरुंगात असताना प्रा. ना. सी. फडके यांचे एक लहानसे पुस्तक वाचले होते—त्याचे आता मला नाव आठवत नाही ! त्यात त्यांनी म्हटले आहे—'क्रांतिकारक वाङ्मय आम्हीही लिहिले असते-पण ते सध्याच्या राजकीय परिस्थितीमुळे अशक्य आहे !' प्रा. फडके यांना सरकारने 'अॅशुरन्स' दिले, तर प्रा. महाशय असे वाङ्मय लिहावयाला अगदी उतावीळ झालेले दिसतात ! बाकी खरा कर्तबगार माणूस ! आम्ही तुम्हांला पकडणार नाही असे सरकारने प्रा. फडके यांना विनंतिपूर्वक विनविले, तर प्रा. महाशय बंडखोरही होतील कदाचित् !

मी म्हटले, "वरच्या प्राध्यापकांच्या विचारांतील आचरटपणा सोडा- पण ते खरं बोलले—अर्थात् कलावंतपणाने—यांचं आपण कौतुक करा- वयाला पाहिजे ! प्रा. फडके यांना मला तर अगदी जिव्हाळ्याने सांगावसं वाटतं की 'उगा-उगा रडू नका. आपलं सरकार खराब आहे-असंच लिहा हं वाङ्मय—लोक आहेत खूष-क्रांतिकारक वाङ्मय सरकार पचू देणार नाही—हात रेऽ सरकारा !' सध्या त्याचं घरं उन्हात बांधलं गेलंच आहे ! पण समाज काही करू शकत नाही ही खात्री असल्यामुळे एक प्राध्यापक आपल्या प्रिय पात्राला बरोबर घेऊन बेवकूबपणाने हिंडत असतो—आता तो प्रा. लेखक नाही ही मेहरबानी आहे - नाही तर श्री. रा. म. आठव- ल्यांचे दोन-दोन चार-चार बायका प्रत्येकाने कराव्यात वगैरे अमौलिक विचार त्यांनी वाङ्मयात चिरस्थायी करून ठेवले असते !" मी प्रा. फडके यांच्या बाजूची साक्ष दिली आणि नंतर पुनः म्हटले, "बरं, पण आपल्यांत सध्या जरी टॉलस्टॉय नसला, तरी प्रा फडके—माडखोलकर—पी. वाय्. देशपांडे—खांडेकर—य. गो. जोशी इत्यादी नामवंत लेखक एकत्र गोळा झाले, तर टॉल्स्टॉयच्या तोलाचे साहित्य निर्माण करतील असे परवा खांडेकर आपल्या अध्यक्षीय भाषणात म्हणाले त्याबद्दल आपले मत काय आहे ?"

"शॉची एक आख्याइका ठाऊक आहे का तुम्हांला ? एका सुन्दर तरुणीने शॉला म्हटले की, तुम्ही आणि मी विवाहबद्ध झालो, तर माझे सौंदर्य आणि तुमची बुद्धिमत्ता यांनी युक्त असे एक असामान्य अपत्य निर्माण होईल. नाही ?—त्यावर शॉ म्हणाला—पण समजा, माझे सौंदर्य आणि तुमची बुद्धिमत्ता त्या अपत्यांत उतरली तर ?—पंक्तीतील द्रोण

एकावर एक पालथे घालून हिमालय बनविण्याची अपेक्षा करण्यासारखेच आहे हे !

--थट्टा सोडा, जोशीबुवा; पण टॉल्स्टॉय, गॉर्की ही नावे हे लोक इतक्या सहजतेने हाताळतात-पण ज्या टॉल्स्टॉय गॉर्कीनी आपले सर्व आयुष्य म्हणजे कोणत्या तरी एका ध्येयासाठी अगर श्रेयासाठी केलेल्या जीवनसमर्पणाची कथा बनवली, त्याचे नांव इतक्या सहजासहजी हे लोक उच्चारतात याचेच मला नवल वाटते !

—विचार लिहिण्यापेक्षा-विचार जगणारे लेखक तेच खरे लेखक— त्यांच्या लेखनाकडून काही अपेक्षा करता येतील-आपले साने गुरुजी घ्या !

—बॅरिस्टर सावरकरांचे 'लेखण्या सोडा आणि तरवार हाती घ्या' हे म्हणणं मला पटतं-लेखण्या सोडा म्हणजे-फेस पॉवडर चोपडण्याच्या ब्रशासारख्या झालेल्या लेखण्या सोडा आणि जोमदार जिवंत विचाराच्या तरवारीसारख्या धारदार लेखण्या घ्या असे त्यांचे म्हणणे-असे मी समजतो ! आणि ते जमत नसेल तर हातात काही घेतले नाहीत, तरी चालेल-पण लेखण्या टाका !

—दुसऱ्या बाजीरावाच्या वेळच्या शाहिरांची भुते—पुनः जागृत होऊन डफ-तुणतुण्यासकट पुन्हा गाऊ लागल्यासारखे अलीकडच्या काही साहित्यिकांबद्दल वाटते ? आणि शरमेची गोष्ट, ते साहित्य पुरोगामी-क्रांतिकारक-तारुण्ययुक्त आहे असे ते म्हणतात आणि याला जे विरोध करतील ते प्रतिगामी-सनातनी-आणि म्हातारे !"

"बरं, का हो गोरे, या साहित्याकडून आपल्या समाजाला धोका वाटतो, का तुम्हांला ?"

"मध्यंतरी धोका वाटत होता-पण आता फक्त किळस वाटते! सध्याची तरुण पिढी आता नवमतवादित्वाचे आणि क्रांतीचे अभ्रे पांघरलेल्या या साहित्यिकांपासून खात्रीने दूर-दूर चालली आहे!

—असल्या साहित्यिकांनी वाङ्मयात उभी केलेली चित्रे सर्वस्वी खोटी आणि दिशाभूल करणारी आहेत–त्यांच्या कलाकृतींना दोन घटका हलक्या दर्जाचे मनरंजन करण्यापलीकडे किंमत नाही हे तरुण पिढीला समजून चुकले आहे!'

—प्रत्यक्ष जीवनाचे दारुण आघात तरुण पिढीला सहन करावे लागत आहेत–आणि या ढोंगी साहित्यिकांचे पोखरलेले भकास जीवन आता उघडे होऊ लागले आहे! ही तीव्रता जसजशी वाढत जाईल, तसतसे या साहित्याचे मूल्य उतरेल, आणि ते साहित्यिकही आपले धोरण बदलतील!'"

"बरं आहे, गोरे! आपण आता मुलाखत पुरी करू या! कारण मला आणखीही काही मुलाखती घ्यायच्या आहेत. तेव्हा सर्व विचार एकाच मुलाखतीत संपविले, तर माझी पुढे अडचण होईल! तेव्हा मी आपणास जाहीर करतो की 'मुलाखत संपली' असे समजून आपण मंडईत जाण्यास मोकळे आहा!"

—आणि असे सांगून मी आपल्या कामाला लागलो.

—पण गोरे थोड्या स्नेहयुक्त रागाने म्हणाले, "जोशीसाहेब–आता आपण काम करू शकत नाही! आपण माझ्याबरोबर मंडईत यायला पाहिजे!"

—अर्थात् कृतज्ञताबुद्धीने मी श्री. गोरे यांच्याबरोबर मंडईत जायला निघालो.

जाताना मी श्री. गोरे यांस सांगितले की, "गोरे, तुम्ही अत्यंत रहस्य युक्त आहां ! इतकी तुमची आमची मैत्री. पण मी तुम्हांला नेहमी खादी-च्याच पोशाखात पाहतो-विलायती सुटाबुटांत मी तुम्हांस अद्याप कधीच पाहिले नाही हे कसे काय ?—निदान आपला तो ड्रेस तरी आम्हांला दाखवाल काय ? कित्येक खादीवाल्याचे असे ड्रेस मी पाहिले आहेत म्हणून विचारतो !"

—माझ्याच सुरात गोरे पुढे म्हणाले, "कळविण्यास अत्यंत वाईट वाटते की, असा पोशाक आम्ही आतापर्यंत कधीच केलेला नाही।"

लोक श्री. गोरे यांना "भाई गोरे" म्हणतात—पण जे विचार त्यांनी मुलाखतीकरिता मला दिले त्यावरून श्री. गोरे हे 'सनातनी' आहेत असे मला तरी वाटते.

—वाचकांनी माझ्याबरोबर सहमत व्हावे हे विनंती.

—आता पुढील महिन्यात मात्र नक्की श्री. के. ना. काळे.—

दी दिग्दर्शक !

* * *

# के. नारायण काळे : : : ७

[भयंकर असामान्य आणि भयंकर दिग्विजयी नसलेले दिग्दर्शक]

मराठीतील सर्व स्तुतिवाचक विशेषणे तिबून तिबून त्यांच्या भरीत रोडग्यांने 'अमर—अलौकिक—असामान्य !' वगैरे शब्दांच्या ताशे-वाजत्र्यांत आगाऊ जाहिरातबाजी केलेला चित्रपट जसा 'पडतो' तसे माझ्या श्री. काळे यांच्या मुलाखतीबद्दल होणार अशी माझी मलाच धास्ती वाटते आहे ? आगाऊ जाहिरातबाजी करायची म्हणून श्री. काळे यांच्या मुलाखतीची मी 'विचारप्रवर्तक व मार्गदर्शक मुलाखत' अशी जाहिरात केली—पण ही मुलाखत वाचकांना 'पडलेली' वाटल्यास मी दाखविलेल्या एका धूर्ततेची वाचकांना आठवण करून देण्याचा मोह मला अनावर होत आहे ! श्री. काळे यांची मुलाखत 'विचार प्रवर्तक आणि मार्गदर्शक होण्याचा संभव आहे' असे मी म्हटलेले आहे—खात्री दिलेली नाही !

श्री. के. ना. काळे यांचा आणि माझा किती तरी वर्षांचा स्नेह आहे ! तो किती दाट आहे हे मी सांगू इच्छितो. समजा, 'सह्याद्री' मासिकात मी घेतलेल्या अनौपचारिक मुलाखती यायला लागल्यापासून श्री. काळे हे 'माझी मुलाखत घ्या—माझी मुलाखत घ्या' म्हणून माझ्या पाठीस लागले होते, अशी जरी मी धडधडीत खोटी थाप मारली तरी ते ती थाप माझ्या स्नेहाकरिता आपल्या अंगावर ओढून घेतील अशी मी ग्वाही देतो !

—आता मी अशी थाप मारणार नाही आणि तेही कबूल करणार नाहीत, ती गोष्ट निराळी !

श्री. के. नारायण काळे हे काय गृहस्थ आहेत हे दोन स्नेही एकमेकांना जितके समजू शकतात तितके मला माहीत आह; पण ज्यांचा श्री. कळ्यांशी फारसा संबंध आलेला नाही ते श्री. काळ्यांच्याविषयी काय मत बाळगून असतात ते मी येथे गंमतीने सांगणार आहे !

'काय गृहस्थ दांभिक आणि अहंमन्य आहे हो !' हे त्यांच्याविषयी निघणारे पहिले उद्गार ! मीही पहिल्यांदा त्यांच्याविषयी हेच उद्गार काढले होते.

त्यांची माझी पहिली ओळख एकंदर तीनदा आणि तीन ठिकाणी झाली. ओळख करून देणाराने आमची ओळख करून दिली. तीनही वेळेला आम्ही एकमेकांना नमस्कार केले. नंतर श्री. काळे चिरूट ओढीत दुसरीकडे पाहू लागले आणि मी विडी ओढीत ओढीत 'काय गृहस्थ अहंमन्य आणि दांभिक आहे', असे मनातल्या मनात पुटपुटत विडीचा धूर सोडू लागलो.

मध्येच एक सुचलेली उपमा ठोकून देतो. श्री. काळे यांच्या आणि

माझ्या विद्वत्तेतील अंतर—प्रतीक ( मॉंटाज ) सांगून टाकतो. ते ओढीत असलेल्या चिरुटात आणि मी ओढीत असलेल्या विडीत—जितक्या जाडीचे किमतीचे आणि स्वादाचे अंतर आहे—तितकेच त्यांच्या आणि माझ्या विद्वत्तेत अंतर आहे! माझा अभिमान आणि गर्व एवढाच की, आमची विद्वत्ता ( म्हणजे काय कुणास ठाऊक ? ) स्वदेशी आहे!

आणि हा सुटाबुटातला साहेब श्री. के. ना. काळे एक दिवस अचानक माझ्या घरी आला. त्या वेळी मी एका सात खणांच्या जुनाट जागेत राहत होतो.

मी आश्चर्याने थक्कच झालो. त्या वेळी मी नुकताच कोठे लिहू लागलो होतो. आणि श्री. काळे त्या वेळी 'प्रतिभा' पाक्षिकाच्या संपादक मंडळापैकी एक होते. आणि प्रतिभेसाठी लेख मागण्याकरिता ते मुद्दाम माझ्या घरी आले होते—आणि काय चमत्कार सांगावा, त्या दिवसापासून श्री. के. ना. काळ्यांविषयी माझे मत बदलले. 'माझा मुलगा' ही चित्रपटकथाही मी श्री. के. ना. काळे यांच्याकरिताच लिहिली आणि त्यांच्यामुळेच लिहिली!

काही माणसे दिसायला भयंकर शालीन आणि लाघवी वाटतात—पण अनुभवाने भलतेच पटते. श्री. के. ना. काळे दिसावयाला दांभिक आणि अहंमन्य वाटतात आणि अनुभवाने मात्र निराळे पटते! फुलझाडांच्या बागेला तारेचे कुंपण असावे तसे काळे यांच्या स्वभावाला त्यांच्या दांभिक आणि अहंमन्य दिसणाऱ्या चेहऱ्याचे कुंपण असावे!

"काळे, मला तुमची मुलाखत घ्यावयाची आहे.' मी एक दिवस श्री. काळे यांस सहज विचारले.

'मग घेऊन टाका--!' श्री. काळे बेदर्दपणाने म्हणाले.

'मग केव्हा येऊ आपल्याकडे ?' मी जरा विनीत स्वराने विचारले.

'माझ्याकडे यावयाला कशाला पाहिजे ? आज इतकी वर्षे आपण एकमेकांना भेटतो आहो, आणि एकमेकांशी मनमोकळेपणाने बोलतो आहो—तुम्हीच सवडीने मुलाखत लिहून काढा—फारसा अवखळपणा त्यात करू नका, तुमचे विचार माझ्या तोंडी घालू नका, आणि साधारण मुलाखतीनंतरही तुमचा आमचा स्नेह टिकावा एवढी खबरदारी घ्या—आणि हो, छापण्यापूर्वी मला एकदा दाखवा म्हणजे झालं !'—आणि श्री. काळे एवढे शांतपणाने बोलून गमन करते झाले.

आणि मग एक दिवस मी माझ्या सवडीप्रमाणे श्री. काळे यांच्याकडे गेलो आहे अशी कल्पना केली. त्यांनीही माझे आगतस्वागत केले असे गृहीत धरले. चहा, फळे, बिस्किटे मनातल्या मनात खाल्ली आणि आम्ही एकमेकांकडे 'मुलाखित' व 'मुलाखत्या' या दृष्टीने पाहिले.

ती वेळ संध्याकाळी सहाची होती. खूप खूप पाऊस पडून गेला होता, तरीही अद्याप आभाळ कोंदटलेलेच होते. हवेमध्ये अत्यंत सर्दपणा आला होता; त्यामुळें नेहमी ओढणाऱ्याचे सोडूनच द्या--पण कधीही न ओढणाऱ्या माणसालासुद्धा--विडी, सिगरेट किंवा चिरूट ओढावासा वाटला असता. इतकी हवा त्या दिवशी सर्द झालेली होती !

माझ्याकडे एक गंभीर दृष्टिकटाक्ष टाकीत श्री. काळे काही तरी शोधू लागले. त्यांनी बरीचशी शोधाशोध केली, पण त्यात त्यांना यश आलेले दिसले नाही. अखेर कपाटावर असलेले एक 'रक्षापात्र' त्यांनी माझ्या-पुढे आणून ठेवले व इझिचेअरवर बसून त्यांनी आपले दोनही पंजे एकत्र करून लांबलचक आळस झाडला !

मीही स्तब्धपणाने खिशात हात घातला आणि खिशातील चार मोडक्या आणि दोन धडक्या विड्या बाहेर काढल्या—त्यांतील मोडक्या विड्या रक्षापात्रात टाकून दोन धडक्या विड्यांकडे मी अभिलाषाच्या दृष्टीने पाहू लागलो.

श्री. काळे यांनी नेहमीच्या सवयीने ओळखले की माझ्याजवळ काड्यांची पेटी नाही. ते ताडकन् उठले. वास्तविक त्यांनी कोणाला तरी काड्यांची पेटी आणावयाला सांगावयाची;पण ते स्वतःच खाली गेले आणि त्यांनी काड्यांची पेटी आणून माझ्यापुढे ठेवली.

साधारण मी अदमासाने ओळखले होते की माझ्या समोरच्या विद्वा-नाला त्याची पाइप किंवा चिरूट सापडत नाही म्हणून ही स्तब्धता आली असावी. त्यांनी आपल्या खिशात हात घातला आणि पाइपमध्ये ओढ-ण्याची तंबाखू ठेवण्याची चामचंची बाहेर काढली व ती त्यांनी एक उसासा टाकीत समोरच्या 'पेयमेजावर'* टाकली.

—पण त्या चामचंचीचा खुळकन् आवाज झाला !

—तंबाखूचा कधी आवाज होतो काय ?

—पण झाला खरा.

—मी ती चामचंची हातात घेतली आणि तिचा पीळ उलगडून पाहिले तो त्यांत दीड रुपयाची चिल्लर निघाली. एखाद्या इतिहास-संशोधकासारखा मी त्या नाण्यांकडे पाहत राहिलो. आणि दिव्य दृष्टीने एखाद्या गोष्टीचे आकलन व्हावे त्याप्रमाणे माझ्या लक्षात आले की, काही तरी विचाराच्या तिरमिरीत या विद्वानाने 'धूम्रपान' तहकूब करण्याचे

* 'टीपॉय'

ठरविले असावे—पण लगेच हवा अशी पावसाळी व कुंद पडेल हे त्या विद्वानाला काय माहीत? हवेमुळे श्री. काळे यांचा तो निश्चय आता डळमळू लागला असावा !

आणि हे माझे म्हणणे लगेच खरे ठरले. कारण मी परत पेयमेजावर टाकलेल्या तंबाखूच्या चामचंचीचा श्री. काळे यांनी वास घेण्याला सुरुवात केली.

त्या काळे यांच्या कृतीने मला आत्मप्रत्ययाचा आणि पुनःप्रत्ययाचाही आनंद झाला. कारण मीही असा सहासहा महिन्यांच्या अंतराने पाच-पाच मिनिटें किंवा क्वचित् पाच-दहा तासहो† विडी न ओढण्याचे ठरवतो. त्याच वेळी विड्यांची पेटी रिकामी करतो—आणि आता त्यांत आपण विड्या ठेवणार नाही म्हणून त्यात पोस्टाची तिकिटे ठेवतो. पहिल्या-पहिल्यांदा मी अशा निश्चयाच्या वेळी, त्यावेळी हयात असलेल्या विड्या मोडून टाकीत असे. पण माझ्या निश्चयाच्या अनुभवाने मी आता विड्या मोडून टाकीत नाही; तर "राहू देत ! आपल्याला ओढावयाच्या नसल्या तरी येणारा जाणाराला होतील !" अशी मनाची समजूत करून मी त्या अलीकडे तशाच राखून ठेवतो--आणि मग त्या पुनः माझ्या मलाच उपयोगी पडतात !

—आणि क्षणा दोन क्षणांनीच श्री. काळयांमध्ये काही तरी विचाराने गतिमानता आली. त्यांनी एक जांभई दिली आणि स्निग्धपणाने माझ्याकडे पाहत ओठातल्या ओठात ते पुटपुटले, 'जोशीबुवा, आणा पाहू जरा तुमची विडी--आज विडी ओढून पाहतो जरा !'

---

† शाळेचे किंवा कॉलेजाचे तास. ते कधी कधी तीसपस्तीस किंवा फार तर पंचेचाळीत मिनिटांचे असतात.

माझ्याजवळही त्या वेळेला नेमक्या दोनच विड्या होत्या; तरीही नाइलाजाने मी त्यांतील एक विडी श्री. काळे यांस दिली. श्री. काळे यांनी ती विडी पेटवून त्याचे एकदोन झुरके घेतले आणि काही तरी आवेगाने त्यांनी ती विडी विझवून टाकली.

आणि काही तरी आवेगाने त्यांनी आपल्या माणसाला हाक मारली आणि आपल्या खिशातील एक कोरी करकरीत दहाची नोट बाहेर काढीत त्या माणसाजवळ देत काळे म्हणाले—

'एक गोल्ड फ्लेक पाकीट—आणखी एक सिगार, ( ज्याला आम्ही चिरूट म्हणतो ) ची पेटी आणि 'थ्री नन्स्' किंवा 'प्लेअर्संच्या' तंबाखूचा टीन जलदी लाव !'

तो माणूस निघून गेला. आणि काळे मला म्हणाले, 'हं, जोशीबुवा, आमच्या मुलाखतीचा विषय काय ठरविला आहेत तुम्ही ? बाकी तुमची गेल्या अंकातील श्री. गोरे यांची मुलाखत एका प्राण्याला भयंकर झोंबली आहे. कळलंच असेल तुम्हाला —'

''आलं आहे कानांवर माझ्याही —पण तो तर आपल्या विद्वत्तेची शेखी मी 'सह्याद्री' वाचीत नाही अशी मारीत असे ! आणि आता म्हणतो आहे की, 'सह्याद्रीत' फक्त जोशी यांच्या मुलाखती गलिच्छ असतात, बाकी अंक फारच चांगला असतो ! मी मनात समाधान मानलं. की निदान माझ्या मुलाखतींमुळे हे जे बुरसलेले काही विद्वान 'सह्याद्री' कडे डोळे झांक करीत होते त्यांचे डोळे उघडले हे काय थोडं झालं ! इंग्लिश वाङ्मयाचे हे ब्लॉटिंग पेपर मराठीकडे या निमित्ताने जरी डोळे उघडून पाहावयाला लागले, तरी माझ्या लिखाणाने फारच चांगले काम केले असं मी समजेन !''

'बरं, माझ्या मुलाखतीचा विषय ?' काळे यांनी उत्कंठेने विचारले.

'तंबाखू !' मी शांतपणे विडीचा झुरका ओढीत म्हटले 'खरंच, काळे, तुम्ही तंबाखू ओढायला केव्हापासून लागला ? पण कारण खरं सांगा हं–मुलाखतीत छापून द्यायचं आहे म्हणून सजवून काही तरी सांगू नका !"

काळे आळस देत म्हणाले, 'खरं सांगू ? मध्यंतरी मी रिकामा होतो–बऱ्याच वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ती-तेव्हा केवळ एकट्याने वेळ काढण्याचे साधन म्हणून मी तंबाखू ओढावयाला लागलो. रिकामपणामुळे बहिर्मुख झालेले मन अंतर्मुख करून चित्तस्वास्थ्य मिळविण्याचे तंबाखू हे जडसाधन आहे ! तंबाखूचा धूर डोळे मिटून तोंडातून सोडताना आपण केवळ पूर्णतेचे पुतळे आहो असा मनाला क्षणिक भास होतो. तंबाखू जरी थोडी अपथ्यकारक असली, तरी एकदा तंबाखूशी आपण तादात्म्य पावलो की ती बौद्धिकताप्रधान असून विचारांची गतिमानता वाढविते हे प्रत्यायास येते ! तंबाखूचे पान चालू असतां कित्येक मौलिक विचार सुचून त्या भरात लेखनात आत्मप्रकटीकरणही चांगले होते !'

'काळे, मला तुमचे म्हणणे पटले ! कारण स्पष्टच बघा तुमच्या तोंडांत पाइप अगर सिगार नसल्यामुळे तुम्हांला जरी आपण आत्मप्रकटीकरण चांगले करतो आहोत असे वाटत असले तरी माझ्या ते नीटसे लक्षात येत नाही—तेव्हा आपल्या सिगार्स आल्यानंतर आपण आपली मुलाखत पुढे चालू करू !'

तोच काळ्यांचा माणूस सिगार, सिगारेट्स व तंबाखू घेऊन आला. श्री. काळ्यांनी एक सिगार पेटविली—आता श्री के. ना. काळे खरे रंगात आल्यासारखे मला वाटू लागले आणि त्यांनी मला विचारले, 'खरंच, जोशी बुवा, आपण केव्हा विड्या ओढू लागला ?'

'आपणाला माहीतच आहे की, माझे पूर्वायुष्य बरेच अडचणींत गेले आहे ! आणि त्यांतच मला लेखनाचा नाद लागला. तेव्हा माझ्या आप्तेष्टांची माझ्याबद्दलची होती नव्हती तोही सहानुभूती नाहीशी झाली-आणि त्याच अवस्थेत मी केव्हातरी सिगारेट ओढू लागलो. वास्तविक व्यसन हे नेहमी स्नेह्यांसोबत्यांकडून लागते—पण माझे विडीचे व्यसन माझे मीच लावून घेतलेले आहे ! मी सिगारेट्स ओढतो हे कित्येक दिवस माझ्यास्नेह्यांना देखील माहीत नव्हते आणि पुढे परिस्थितीने सिगारेट्स परवडेनात तेव्हा मी विड्या ओढू लागलो ! आणि आता सिगारेट्स परवडणे शक्य आहे तरी विडीची चव तोंडात बसली आहे—ती मजा सिगारेटमध्ये वाटत नाही—!

'बरं काळे' तुम्ही मध्ये सिगारेट काही दिवस सोडली होतीत—ती पुनः का ओढायला लागलांत ?'

'हं, त्याचं विश्लेषणही करण्यासारखं आहे ! काय होतं, आपण स्वतःच्या अशा काही नीतिअनीतीच्या—न्यायअन्यायाच्या कल्पना ठरविलेल्या असतात—आणि त्याच्या विरुद्ध जर अनुभव आला—त्या वेळेला व्यावहारिकपणानं तो कटू अनुभव आपल्याला न बोलता सोसावा लागला—तर त्या वेळी तंबाखू ओढणं ही एक परिस्थितीतून सुटका वाटते !'

'मलाही अनुभव आहे त्याचा !' मी पटकन् बोलून गेलो. 'पण काय हो काळे माझे नुसते विडीवर भागते आणि तुम्हांला सिगार, सिगारेट्स, पाइप इत्यादी त्रिविध साधने लागतात. तेव्हा आपल्याला सामाजिक अन्यायाशी जास्त तोंड द्यावं लागतं अशी मी कल्पना करू काय ?'

'कल्पना केल्यास माझी काही हरकत नाही ! पण तसं काही नाही ! बरं पण जोशीबुवा, माझी मुलाखत 'विचारप्रवर्तक आणि मार्गदर्शक'

होणार म्हणून अगोदरच जाहिरात केलीत आणि मुलाखतीकरिता विषय निवडलात तंबाखू—तेव्हा माझ्या मुलाखतीत निदान एखादा तरी विचार यावा !' इतके बोलून श्री. काळे यांनी आपल्या तोंडातील सिगार विझवली. आपला आवडता पाइप बाहेर काढला, त्यात तंबाखूची एक बारीकशी पुरचुंडी करून घातली आणि त्या तंबाखूला काडी लावीत व एका मागून एक धुराचे फवारे सोडीत काळे बोलू लागले :

'मानवी जीवनात मनुष्यप्राण्याला अन्नवस्त्राइतकीच जर कोणत्या तिसऱ्या गोष्टीची जरूरी असेल तर ती विसाव्याची ! प्रत्येक मनुष्याला कामाइतकीच करमणुकीची आवश्यकता आहे ! याबद्दल या विसाव्या शतकात तरी कोणाचे दुमत होईल असे वाटत नाही ! उद्योगप्राप्त ज्ञानामधून मानव जातीची भौतिक प्रगती झाली असली तरी करमणुकीसाठी काढलेल्या कल्पनांमुळे त्याच्या सांस्कृतिक विकासाचा मार्ग चोखाळला गेला आहे ! उद्योगानंतरच्या विसाव्याच्या क्षणांतून कलांचा जन्म झाला नसता, तर मानवी जीवनाला रूक्ष, नीरस आणि कंटाळवाण्या कलहापेक्षा वेगळे स्वरूप प्राप्त होणे अशक्यप्राय झाले असते ! विज्ञानाने मनुष्याला सृष्टीतील शक्तींवर प्रभुत्व दिले, तर कलांनी त्याच्या जीवनात सौंदर्य, सरसता आणि उत्साह यांची भरती केली ! यामुळे ज्ञानाइतकीच कला हेही मानवी जीवनाचे एक अंग समजणे भाग आहे ! म्हणून कलेचे पावित्र्य संभाळणे, हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे ! मनुष्यांनी आपले विसाव्याचे क्षण वाटेल तसे उधळण्यापेक्षा-तंबाखू पीत घालविणे बरे ! पण त्याहीपेक्षा दुसऱ्या कोणत्या तरी अतीव चांगल्या तऱ्हेने घालविणे जास्त श्रेयस्कर, पथ्यकर—!'

'काळे,—मला हे तुमचे म्हणणे फार आवडले पण यात काही म्हणीवजा इंग्लिश शब्दांची घुंगरं असती तर बरे झाले असते ! मला सध्या

प्रा.फडक्यांच्या भाषणातील 'लिटरेचर फॉर दी पीपल, बाय दी पीपल ॲन्ड ऑफ दी पीपल' या त्रिसूत्रीची घुंगरं ऐकताना फार कर्णमधुर वाटतात !'

'पण त्यांच्या पाठीमागे आत्मप्रत्ययाचा विशेष जोर नसल्यामुळे आमच्या मनावर त्याची मोहनी पडत नाही ! आणि शिवाय ही त्रिसूत्री पहिल्यांदा अब्राहाम् लिंकन् यांनी ज्या एका विशाल, भव्य आणि समर-प्रसंगी वापरली त्यात फक्त एका शब्दाचा फरक करून–अब्राहाम् लिंकनचे मूळ वाक्य आहे 'गव्हर्नमेंट फॉर दी पीपल, बाय दी पीपल ॲन्ड ऑफ दी पीपल !'– लहान मुले अभ्यासाच्या पुस्तकातील चित्रांवर मिशा-गंध-किंवा लुगडे, चोळी वगैरे पेन्सिलीने काढून त्या चित्रांची दुर्दशा करतात त्याप्रमाणे प्रा. फडक्यांनी त्या मूळ वाक्याचे हाल चालविले आहेत ! मला प्रा. फडक्यांबद्दल फार आदर आहे !'

'असं होय, मग समजा मी उद्या तंबाखू या विषयावर व्याख्यान दिले—आणि हीच शब्दांची घुंगरं 'टोबॅको फॉर दी पीपल, बाय दी पीपल, ॲन्ड ऑफ दी पीपल—हंऽहं ! असे म्हटले तर चालेल काय ?'

'जोशीबुवा, मुलाखतीच्या शेवटी आपण थोडे गंभीर वातावरण ठेवू या !'

ठीक आहे—मग तुम्ही दिग्दर्शक आहांत, मी लेखक आहे—तो वाद लढू या आपण आता !'

'पण त्याच वेळेला मीही काही चित्रकथा लिहिल्या आहेत हे विसरू नका !'

'काळे, ते मलाही माहीत आहे ! आपण बी. ए. एल्एल् बी. आहांत, नट आहांत, दिग्दर्शक आहांत, कथालेखक, टीकाकार आहांत, आपण

पुरुषसूक्त आणि पुढेही म्हटलेले आहे आणि शिवाय विद्वान् आहांत —आणि तुमच्या बाबतीत तुम्हांला विद्वान् म्हणून मी फार घाबरतो ! माझ्या लेखनाच्या काही कल्पना मी आपल्या विद्वत्तेत तपासून घेतलेल्या आहेत आणि त्याप्रमाणे आपल्या विद्वत्तेचा फार उपयोग होतो आणि झालेलाही आहे ! आणि शिवाय आपण पूर्ण गृहस्थवृत्तीचेही आहांत. फार काय सांगावे ? काळे, आपल्या लक्षात नसेल आपण माझ्या वादविवेचन मालेचे वर्गणीदारही आहांत ! पण आज आपण प्रसिद्ध आहांत प्रामुख्याने दिग्दर्शक म्हणून ! तेव्हा त्या बाबतीत मी काही प्रश्नोत्तरे करतो !'

'ठीक आहे !' श्री. काळे म्हणाले. त्यांनी चालू असलेले आपले धूम्रपान संपविले—आणि एक नवा चिरूट पेटवीत ते इझिचेअरवर जरा गुर्मीत आल्यासारख्याच चेहऱ्याने आडवे झाले.

'लेखक-दिग्दर्शक हा वाद दोन निरनिराळे मीडियम् तंत्र वगैरे शब्दांच्या धुमाकुळाने आपण जिंकू शकाल. पण तत्त्व आणि व्यवहार यांची जेव्हा फारकत होते—ते सोडा. मी तुम्हांला एक प्रश्न विचारतो. लेखकापेक्षां दिग्दर्शक श्रेष्ठ असतो हे मी पहिल्यांदा गमतीखातर कबूल करतो, पण—पगारी-दिग्दर्शक आणि मालक-दिग्दर्शक या दोघांनी दोन स्वतंत्र चित्रपट काढले, तर मालक दिग्दर्शकाचा जितका गवगवा आणि प्रसिद्धी होते तितकी पगारी-दिग्दर्शकाची होते काय ? त्यांनी दिग्दर्शित केलेला चित्रपट मालक-दिग्दर्शकाच्यापेक्षा चांगला असला तरी ? कलेच्या वजनमानाने ? तुम्हांला या बाबतीत काय अनुभव आहे ?"

"अहो जोशीबुवा. येवढे का जग सोवळे आहे—अहो, व्यवहार आहे हा !" श्री. काळे यांनी आणखी एक धुराचा फवारा सोडला.

"यापेक्षाही मला स्पष्ट उत्तर पाहिजे !" मी आग्रह धरला.

श्री. काळे यांनी माझ्याकडे जरा तिरसटलेल्या दृष्टीनेच पाहिले. डोळे जरा विचारप्रवर्तक दृष्टीने फिरविले--तोंडाने हळूहळू धूर सोडणे चालू होतेच.

मी शांत मनाने श्री. काळ्यांकडे पाहत होतो.

पाच मिनिटे गेली--दहा मिनिटे गेली--आणि श्री. काळ्यांचे डोळे मिटल्यासारखे मला वाटले आणि एकदोन मिनिटांत त्यांचे घोरणेही मला चक्क ऐकायला यायला लागले.

मला आता तिथून उठताही येईना आणि धड तिथे बसताही येईना-मी श्री. काळ्यांकडे गंभीर दृष्टीने पाहत बसलो आणि नंतर मलाही केव्हा झोप लागली हे माझ्याही लक्षांत आले नाही !

आणि नंतर मला वाटते सुमारे अडीच तासांनी श्री. काळे यांच्या पत्नी सौ. शांताबाई, त्यांचे मुलगे—प्रमोद, अशोक यांच्या हसण्याचा केवढा तरी आवाज ऐकून आम्ही दोघेही जागे झालो—माझी नजर चटकन् समोरच्या घड्याळाकडे गेली—मी मुलाखतीचे कागद खिशात कोंबीत जिना उतरू लागलो.

श्री काळे बसल्या जागेवरून मला चहा घेऊन जाण्याबद्दल आग्रह करू लागले—पण मुलाखतीचा हाच गंमतीदार शेवट मला फार आवडला आणि चहाकरिता थांबल्यास--आणखी काही प्रश्नोत्तरे पुढे होतील या भीतीने मी तडक घर गांठले.

माझे मित्र श्री. के. ना. काळे यांची जेव्हा मी मुलाखतीकरिता निवड केली. तेव्हा मलाही त्या मुलाखतीबद्दल फार आशा होती. पण प्रत्यक्ष ती मुलाखत लिहिण्याचा जेव्हा प्रसंग आला--तेव्हा माझी निवड चुकली

असे मला वाटले. कारण व्यवहार! श्री. काळे यांच्या मुलाखतीत जे विचार आणि जो मते मला मांडायची होती—त्यांचे जे विशिष्ट अनुभव यावेत अशी माझी इच्छा होती—पण व्यवहार !

—ही मुलाखत म्हणजे व्यावहारिक कुचंबणेचा एक भयंकर नमुना आहे.

अखेरशेवटी त्यांच्या मुलाखतीकरिता मला 'तंबाखू' हा निर्जीव विषय निवडावा लागला. मी मनात धरलेल्या प्रश्नाची श्री. काळे यांनीही निर्भीड उत्तरे दिली असती—पण मलाच ते करणे बरे वाटले नाही.

अखेर एकच सांगतो--सिनेमा-दिग्दर्शकांच्या ज्या जातींबद्दल माझा रोष आहे, आणि जो एक नादान विद्वान् त्या जातीचा लाचारीने सध्या बुरख्याआडून पाठपुरावा करीत आहे, त्या जातीतले श्री. के. ना. काळे नाहीत—येवढेच त्यांच्याबद्दल आदराने सांगतो! त्यांनी चित्रपटकथा लिहिल्या--त्या आपण लिहिल्या आहेत हे त्यांना आज सांगावे लागते—पण त्या चित्रपटकथांचा दिग्दर्शक मात्र आपले नाव गाजवून आहे. ही परिस्थिती अत्यंत चीड आणणारी आहे हे मात्र श्री. काळ्यांच्या परवानगी-शिवायही येथे सांगून टाकतो !

* * *

## श्री. गंगाधर भाऊराव निरंतर, एम्. ए. : : ८

मी माझ्या एका गोष्टीत एका तरूणाचे असे वर्णन केले आहे–

'मी बी. ए. आहे, बी. एजी. व बी. एस्सी. आहे ! बी. कॉम्., जी. डी. ए. आहे. इंग्लिश-मराठी शार्टहँड टाईपिस्ट आहे–यंदा एच्. पी. ला बसलो आहे आणि एच्. पी. चा निकाल लागेपर्यंत मी सध्या एका ओळखीच्या डॉक्टरकडे कंपाउंडिंग करीत असतो. एक परीक्षा पास होऊन तेवढ्यात नोकरीचे कुठे जुळले नाही तर मधल्या वेळात मी कोणची तरी एक परीक्षा देतो–आणि आता एच् पी. होऊनही जर माझ्या नोकरीची कुठे सोय झाली नाही तर मात्र पुढे कोणच्याही परिक्षेच्या नादी न लागता मी तालमीत जाणार आहे !'

माझे स्नेही श्री. निरंतर यांची मुलाखत घेण्याच्या विचारात अस-

ताना वरील वाक्ये मला सहज आठवली. कारण श्री. निरंतर यांच्या आयुष्याशी त्याचे बरेच साम्य आहे !

श्री. निरंतर एम्. ए. आहेत. गेल्या वर्षी धांदलीत ते एस्. टी. सी. लाही बसणार होते आणि त्या प्रमाणे त्या शिक्षणाला जायला त्यांनी सुरवातही केली होती. पण ते अपुरेच राहिले. पीएच्. डी. साठी फायलॉलाजी' वर ते एक थीसीसही लिहितच आहेत—त्यास आज चार वर्षं झाली आणि चालू वर्षी गांधी ट्रेनिंग कॉलेजमधून एक वर्षाची रजा घेऊन ते बी. टी. होण्याच्या तयारीला लागले आहेत !

या गृहस्थाची गाठ घ्यायची म्हणजे कोण पंचाईत ! भेटला तर दिवसातून चार वेळ भेटेल आणि नाही म्हणजे सतत हेलपाटे घालून महिन्यामहिन्यात भेटणार नाही !

त्यांच्या घरावर 'आहेत' 'नाहीत' अशा पाट्या आहेत. कॉलबेल आहे–घरात माणसं आहेत; पण—

'निरंतर आहेत का ?'

'अं हं–आज सकाळीच कुठे बाहेर गेले आहेत !"

'केव्हा परत येतील ?'

'तसं काय सांगावं ? काल सकाळी गेले ते रात्री अकराला परत आले !'

—या गृहस्थाची मुलाखत मी या महिन्याला घ्यायचे ठरविले आहे हे त्यालाही माहीत होते-पण त्याची माझी गाठच पडेना !

अखेर परवा सकाळपासून पिच्छा धरला. त्यांच्या सर्व स्नेह्यांची घरे पालथी घातली. गावात सभा कुठे कुठे आहेत तेथेही पाहिले—कुठेही

आस्थेने काम करण्याची या गृहस्थाची सवय पाहून आणि गावा सध्या लग्नसराई चालू असल्यामुळे, मला थट्टेने वाटले, गावातील एखाद्या लग्नात 'अत्तर-गुलाब' वाटायला तर हा गृहस्थ गेला नाही ?

अखेर कंटाळलो आणि बादशाही बोर्डिंगात चहा घेऊन परत घरी यावे असे मनात ठरविले. बादशाही बोर्डिंगच्या एका स्पेशल रूमवर 'रिकामी' अशी पाटी होती—मी दार उघडले.

—आणि प्यालेल्या चहाची कपबशी टेबलावर अस्ताव्यस्त पडली आहे—आणि आमचे निरंतर महाराज अगदी रिकाम्या आणि शुष्क मनाने सिगारेटचे झुरके ओढीत बसले आहेत !

मला पाहून निरंतर दचकले. त्यांनी त्या धांदलीत माझ्याकरिता चहा मागविला. मी त्यांच्याकडे पाहून नुसता हसलो !

'जाऊ द्या हो जोशीबुवा—कसली आली आहे मुलाखत ! चहा घ्या—दोन विडया ओढा—आणि जाऊ आपण आपआपल्या घरोघर ! मला आज खरोखरच कंठाळा आला आहे !'

'बरं, मुलाखत राहू द्या ! मलाही कंटाळल्यासारखे झालेच आहे ! फिरायला येता आज कुठे तरी ?-चला दोघेच जाऊ !' मी म्हटले.

'कुठे जाणार फिरायला आता ? चला फार तर एस्. पी. कॉलेजच्या ग्राउंडवर-कुठे तरी एकीकडे जाऊन बसू !'

मी मानेनेच आपली संमती दर्शविली; आणि आम्ही दोघेही तिथून उठून कॉलेज ग्राउंडवर अगदी कोपऱ्याला—जिथे आजूबाजूला कोणी फिरकणार नाही अशा ठिकाणी—जाऊन बसलो.

पंधरावीस मिनिटे आम्ही इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्या.

संध्याकाळचे साडेसात वाजून गेले होते. तो चांदण्याचा पंधरवडा होता. आजूबाजूला मोठी मजा दिसत होती.

आणि तशात मध्येच एखादी येणारी वाऱ्याची झुळूक-'काय समजल ना ?' असं जसं आपण एखाद्याला हलवून विचारतो त्याप्रमाणे ती मध्येच येणारी वाऱ्याची झुळूक आजूबाजूच्या सृष्टिसौंदर्याबद्दल 'काय समजलं ना ?' असेच जणू म्हणत आहे, असे मला वाटत होते !'

'निरंतर-तुमचे वडील गेल्याला दोन वर्षे होत आली नव्हे ?' मी विचारले

'हं-' निरंतर एक निःश्वास सोडीत म्हणाले.

'—आणि मला वाटतं तुमची सुधा गेल्याला ?'

'वडिलांच्या अगोदर अहा महिने-नंतर वडील गेले-आणि नंतर सहाच महिन्यांनी आमचा आजचा हसता खेळता अरुण जन्माला आला !

'निरंतर मला वाटतं तुमच्या-आमच्या ओळखीला दहा-बारा वर्षे तरी झाली असतील; पण आपण तुमच्या खाजगी आयुष्याबद्दल कधीच काही बोललो नाही ! आज तुमची लहर लागत असेल तर बोलू या काही तरी !'

'खाजगी आयुष्य ! काय करायचं आहे बोलून ?'

'सहज गंमत म्हणून ! तुमच्या जुन्या आयुष्यातू पुन्हा तेवढीच एक फेरी मारून आल्यास तुमच्याही मनाला जरा गंमत वाटेल ! आणि मलाही एक नवे आयुष्य कळल्याचा आनंद वाटेल ! पण तुमचे खाजगी आयुष्य जर अगदीच भकास असेल तर मात्र माझा आग्रह नाही !

'भकास !' निरंतर उत्तेजित स्वराने म्हणाले, 'अरे दोस्त, माझं

खाजगी आयुष्य मोठे मजेदार आहे !' संपत आलेली सिगारेट जमिनीवर विझवून, पाण्याच्या पृष्ठभागावर लहरी उत्पन्न करण्याकरिता आपण एखाद्या जलाशयावर जसा खडा फेकतो त्याप्रमाणे ते विझवलेले सिगारेटचे थोटूक समोर भिरकावीत आणि एकदम उठून उभे राहून एकदा मोठ्यांदा हसत निरंतर पुनः खाली बसले आणि म्हणाले—

"आमचे वडील-आम्ही त्यांना 'भाऊ' म्हणत असू—काय अभिमानी होते ! ते एक साधे मराठी शिक्षक होते ! धड ना उजेड, धड ना अंधार अशा या आत्ताच्या वेळेवरून मला माझ्या आयुष्यातील एका प्रसंगाची आठवण होते आहे !—मला वाटते, त्या वेळी मी मराठी चौथीत किंवा पाचवीत होतो. माझा थोरला भाऊ दादा, माझ्या तीन बहिणी आणि माझी आई असे आम्ही घरात बोलत बसलो होतो-तोच माझे वडील बाहेरून आले. वडिलांच्या काहीशा ताठर आणि स्वाभिमानी मनोवृत्तीमुळे काही एका प्रकरणात त्यांचा पगार थोडा कमी झाला होता !

वडील घरी येताच त्यांनी ही हकीकत घरात सांगितली आणि आम्हां दोघां मुलांना हाक मारून ते म्हणाले, 'दादा-पंडित—मला माझे वडील 'पंडित' म्हणत—आजपासून सूर्यास्ताच्या आत घरातील जेवणे झाली पाहिजेत ! आजपासून सूर्यास्तानंतर घरात येणाराला जेवण बंद ! आता आपल्याला काटकसरीने राह्यला पाहिजे ! इथून पुढे घरात एकच दिवा लागेल आणि तोसुद्धा फक्त काही वेळ !'

त्या लहानपणातही मला माझ्या वडिलांबद्दल आदर वाटला ! 'सूर्यास्तानंतर जेवण बंद !' ही आम्हांला शिक्षा न वाटता एखादे व्रत घेतल्या-सारखा आम्हांला आनंद वाटला !

—पण नंतर लगेच दोन-चार दिवसांतच आम्हां दोघां भावांनाही बाहेरून'यायला उशीर झाला. आम्ही मुकाट्याने उपाशी पोटीच निजलो-घरात आमचे अन्न तयार होते. आम्ही डोळे मिटून गुपचुप पडलो होतो!-आमची आई! आमच्या कानांवर काही वेळाने आई-वडिलांचा संवाद पडला.

'आजच त्यांना उशीर झाला आहे—घालू का त्यांना जेवायला!'

'हं!' वडिलांचा हुकार आला.

नंतर आईने आम्हां दोघांनाही हाक मारली. आमच्या आईचे आम्हांला संरक्षण असे; पण ते तत्त्वच्युतीचे संरक्षण नसे! या प्रसंगावरून आमच्या आईची तुम्हांला कांही कल्पना आली तर पाहा. आम्ही दोघेही उठलो—आईने पाने मांडली, आम्ही जेवलो—कोणीही कोणाशी शब्द बोललो नाही-त्या जेंवणाची आठवण झाली की अजूनही "

—निरंतरांचे डोळे पाण्याने भरून आले होते.

आमच्या वडिलांचे म्हणणे काय होते की आम्ही शिक्षणाच्या नादी फार लागू नये—पण दादाने शिकायचे ठरविले—मोठ्या गणपतीच्या पाठोपाठ लहान गणपतीचीही मिरवणूक निघते-अर्थात् मीही शिकण्याचेच ठरविले. वडील म्हणाले, 'शिक्षणाकरिता माझ्याकडून तुम्हांला काही मदत मिळणे आपल्या परिस्थितीनेच अशक्य आहे. तेव्हा तुम्हांला कुठे तरी वार वगैरे लावून—मला वाटतं, तो अपमान सोसण्यापेक्षा—इथे होईल तेवढ्या शिक्षणावरच!—

—दादा आणि मी पुण्याला आलो. वार लावून शिक्षण सुरू केले. मी आणि मला आज पितृतुल्य असलेले माझे दादा यांच्या मनोवृत्तीची

कल्पना येण्यासारखी एक गोष्ट सांगतो तुम्हांला—एका सुट्टीत आम्ही पुण्याला लवकर परत आलो-शाळा-कॉलेजे सुरू व्हायला अवकाश होता-शिक्षणाकरिता वार लावण्यात आम्हांला कधीच कमीपणा वाटला नाही-आम्हांला त्या वेळीही वाटे, आम्हीही पुढे बरे दिवस पाहिले की आम्हीही शिक्षणाकरिता वारकरी ठेवू—

—पण शाळा सुरू व्हायच्या अगोदर चार-सहा दिवस आम्ही पुण्याला आलो होतो. घरून निघताना आमच्या मनात विचार आला नाही; पण इथे येतांच विचार आला, 'शाळा अद्याप सुरू नाही—मग त्या मुदतीत वाराने जेवण्याचा काय अधिकार आम्हांला ?' दादा मला म्हणाला. 'पंडित, चल आपण परत घरी जाऊ-शाळा सुरू झाल्याखेरीज-' शाळा सुरू होईपर्यंत आम्ही वाराच्या घरी जेवायला गेलो नाही. त्या वेळीं मी लहानसा मोठा होतो; तरीही मी दादाच्या गळ्यात मिठी मारली-आणि संपले-आम्ही आपले दिवस काढायला सुरुवात केली !

"वडिलांची व्यावहारिक आणि स्वाभिमानी वृत्ती मला आवडत होती; पण त्या वृत्तीविषयी मला कधी फारसे प्रेम वाटले नाही. माझ्या थोरल्या भावाची-दादाची-जवळ जवळ वडिलांसारखीच मनोवृत्ती होती; पण त्याला मनमोकळेपणाच्या दिलखुलास खिडक्या आहेत ! वडिलांच्या मनोवृत्तीला मी फणसाची उपमा देईन, तर दादाच्या मनोवृत्तीला मी रत्नागिरी हापूसच्या आंब्याची उपमा देईन !

—माझ्या दादाचे शिक्षण पुरे होऊन तो पुढे इंदूरला नोकरीनिमित्ताने गेला; पण मला पुण्याच्या आयुष्याची गोडी लागली होती-व्याख्याने, वर्तमानपत्रे, पुस्तके-मी पुण्यालाच राह्यचे. ठरविले दादांनीही परवानीग

दिली—कारण कुणाच्या नादी लागून मी बिघडणार नाही हो माझ्या दादाची माझ्याबद्दल खात्री होती !

—मीही आता मॅट्रिक पास झालो होतो—आणि दर परीक्षेच्या वेळी एक एक कसले तरी पुस्तक लिहून मी एक एक परीक्षा दिली. 'विवेकानंदांचा सामर्थ्यवान् संदेश' हे माझे पहिले पुस्तक--'हिंदुधर्मावरील कलंक'--स्वराज्यशिष्टाई' – 'रशियाचे गांधी'—काही रूपांतरित, काही भाषांतरित–कारण मला काही त्या पुस्तकांनी नाव मिळवायचे नव्हते–फक्त पैसे मिळवायचे होते—ते माझ्या अडचणीच्या कुवतीप्रमाणे मला मिळाले ! दादाच्या मदतीवर मी निर्धास्त होतो ! आणि अजूनही आहे ! आज मी आता बी. टी. करिता जात आहे—नोकरीबद्दल कधी अनिश्चितता वाटली तरीही मी नेहमी बेफिकीरच असतो. कारण मला अंतर्यामीची खात्री आहे की, माझ्या कशाही परिस्थितीत माझे प्रेमाने स्वागत करायला इंदूरला एक घराचे दार अहोरात्र उघडे आहे !

देवाबदल लहान मुलांना जशी भीती आणि आदर वाटतो त्याप्रमाणे माझी वडिलांच्याबद्दलची भावना होती आणि आहे !

—नशिकच्या वसंत व्याख्यानमालेत माझे वडील हयात असतांना माझे एकदा 'रामायणातील सीता' या विषयावर व्याख्यान झाले. वडील नाशिकला आहेत म्हणून ते व्याख्यान मी मुद्दाम पत्करले होते–मनात सहज वाटले की वडिलांना 'त्यांचा पंडित कसा बोलतो' ते एकदा दाखवावे—म्हणून मी व्याख्यानाची खूप तयारी केली.

—व्याख्यानाला निघताना 'कोण कोण येणार ?' म्हणून मी आशाळभूतपणाने विचारले. बहिणी येणार होत्या. आई येणार होती; पण

वडील ? त्यांची काहीच हालचाल दिसेना. त्यांना 'चला' म्हणून म्हणण्याचे धाडसही मला नव्हते !

—माझा सर्व उत्साह मावळला. मला घरातून निघतानाच गुदमरल्या-सारखे झाले. व्याख्यानाला गर्दी बरी जमली होती—आईही आली होती-बहिणीही आल्या होत्या-पण ज्यानी यायला पाहिजे होते ते माझे वडील मात्र आलेले नव्हते !

—व्याख्यानाला सुरुवात झालो. गर्दी बरी जमली होती. पण माझ्या व्याख्यानाला काही रंग भरेना-अशी वीस एक मिनिटे गेली-मी भिर-भिरत्या नजरेने सगळीकडे पाहत होतो—आणि नाशिकला यशवंतराव महाराजांचे देऊळ आहे ना, त्या देवळाच्या पायऱ्यावर माझ्या भिरभिरत्या नजरेला माझे वडील एकाग्रतेने माझे भाषण ऐकताना मला एकाएकी दिसले !

—चतुर्थीचा उपास सोडण्याकरिता जसे चंद्रदर्शन व्हावे लागते-तसे माझे झाले. आणि मग काय, माझ्या व्याख्यानाला रंग चढला !

—व्याख्यानाहून आई-बहिणीसकट मी घरी आलो. वडील अगोदरच घरी येऊन बसले होते. आणि त्या दिवशी आईला कसा धीर झाला कुणास ठाऊक ? ती म्हणाली, 'पंडिताच्या व्याख्यानाला किती टाळ्या पडल्या आज ?'

वडील गंभीरपणाने म्हणाले, 'मीसुद्धा वाजवल्या त्यांतल्या काही ! पण या टाळ्यांचा उपयोग काय ? व्यवहारात त्याची काही किंमत आहे का ?'

—म्हणजे वडिलांना बहुतेक असे म्हणायचे होते, 'चांगले बोलला—चार ठिकाणी अगत्याची आमंत्रणेही येतील—फार तर रेल्वे खर्च देतील—

टांगाभाडे वगैरे किरकोळ खर्चाचा भूर्दंडच बसेल ! एकदोन दिवस फुकट जातील ! आणि त्या आर्थिक जखमेवर फुंकर म्हणून फार तर एखाद्या वर्तमानपत्रात वाचाल-'श्री. निरंतर यांचे अत्यंत उद्‌बोधक आणि परिणामकारक भाषण झाले !'

"माझे वडील अगदी जुन्या मताचे होते. त्यांना त्यांची स्वतःची कामे आम्ही त्यांच्या मुलांनी केल्यासही आवडत नसे. इतके ते स्वावलंबी होते ! पण आम्हां दोघां भावांवरही त्यांनी कधी आपले विचार लादण्याचा प्रयत्न केला नाही ! जसे ज्याचे त्याने आपले कपडे वापरावेत त्याप्रमाणेच त्यांचे आचारविचाराबद्दल मत होते !

—नंतर मी बी. ए. झालो. लग्न केले. एम्. ए. झालो. मला फारशी शिकलेली बायको नको होती-ती माझी एक आवड होती-मला तशीच बायको मिळाली-मला अभिमान वाटतो-तिला सर्व व्यवहार कळतो—चांगले-वाईट कळते-तिला मतेही आहेत-पण तरीही त्या मतांमुळे आमच्या संसारात कधी गैरसमजाचे दंगे निर्माण होत नाहीत !-लग्नानंतर माझ्या आनंदाला थोडी नवी पालवी फुटायला लागली होती-मी कौतुकाने माझ्या एका लहान मेहुणीला शिक्षणाकरिता-आणली आणि हाय ! ती एक दिवस चुलीवरच्या फळीवरचे पातले काढण्याचा प्रयत्न करीत असता कपडे पेटून जळून मेली !

—माझे मन पोळले ! तोच मला एक मुलगी झाली--पुनः मी आनंदाने बहरलो—ती दोनतीन वर्षांची होऊन गेली--वडील वारले आणि मग आमचा सध्याचा अरुण जन्माला आला !

—शिक्षण संपल्यानंतर—काही दिवस ज्ञानप्रकाशात नोकरी केली-

पुष्कळ वर्षे सेवासदनमध्ये काढिली—शिकवण्या केल्या–नंतर 'गांधी ट्रेनिंग कॉलेज' मध्ये सध्या आहे ! एक नदीचा प्रवाह येतो—वाहून जातो—पुन्हा पुढच्या वर्षी पाऊस पडतो, रुळलेल्या मार्गाने पुन्हा निराळे पाणी वाहत जाते आणि त्या दरवर्षी निरनिराळ्या पाण्याच्या रूपाने लोळण घेणाऱ्या ओघाला काही तरी एका नदीचे नाव असते. तसेच निरंतर वाहणाऱ्या जीवनाच्या ओघातील पाण्याची एक सर या निरंतरची आहे !

—आता या नदीच्या उपमेवरून पुनः सांगतो—काय योगायोग असतो पाहा—माझ्या मुलीचा, 'सुधेचा' मी एक हात धरून मी एकटयाने फोटो काढला होता—पण तो लहानगा जीवनौघ मध्येच आटला !—माझ्या अरुणचाही मी परवा तसाच एक फोटो सहज काढला—अरुणच्या फोटोत मी आहेच; पण त्याची आईही मागे उभी आहे ! आता मात्र ते चित्र पुरे वाटते ! आता आमचा अरुण कुठे आहे म्हणून मला कावरेबावरेपणाने 'सुधे' सारखे पाहावे लागणार नाही—तर कित्येक वर्षांनंतर 'मी कुठे आहे' हे त्यालाच पाहावे लागेल. आज अरुणच्या बाललीलांत आम्ही पुनःप्रत्ययाचा आनंद उपभोगीत आहोत !

—मला सध्या शंभर एक रुपये महिना सहज मिळतात—पण खूप वेळ जातो त्यात ! शिक्षणाकरिता आपण घेतलेल्या मदतीची फेड करण्यातच माझे पुष्कळ पैसे खर्च होतात ! मी आपल्या बहिणीच्या मुली शिक्षणाकरिता जवळ बाळगल्या आहेत !-कित्येक विद्यार्थ्यांना मी या ना त्या हाताने मदत करतो-करीत राहीनच. रॉयल एशियाटिक सोसायटीची वर्गणी—पुस्तक खरेदी—मी पुनः कफल्लकच आणि ओढाताणीतच ! पूर्वी वार होते, सध्या घरी जेवतो आहे !

—परवा सहज एका पौराणिक पुस्तकांत वाचले-श्रीरामचंद्राने राम-

रावण युद्ध संपल्यानंतर सर्वांना देणग्या दिल्या-त्यांत हनुमंतालाही एक रत्नमाला दिली-हनुमंत त्यातील प्रत्येक रत्न फोडून त्यात 'राम' आहे का पाहू लागला-तशी माझी वृत्ती झाली आहे ! मला नक्की काय हवे आहे ते जरी माझे मलासुद्धा कळत नसले-तरी मला जे पाहिजे आहे ते या भोवतालच्या पसाऱ्यात नाही येवढे मात्र माझ्या नक्की लक्षात आले आहे !

—माझ्या परिस्थितीची मला कधीच खंत वाटत नाही !-पण काही वेळेला चीड येते ! कशाची ? परिस्थितीची नव्हे-अगोदरच जे मानाच्या आणि सुस्थितीच्या जागा पटकावून बसले आहेत-ते त्यात स्वतःची अनन्यसाधारण कर्तबगारी आहे असे समजून आमच्याकडे तुच्छतेने पाहतात, त्याची चीड येते ! मोठमोठ्या जागा आज रिकाम्या झाल्या तर बेकार तरुणांतसुद्धा त्या जागांचे खरे मानकरी सापडतील !

माझ्या मनातून प्रोफेसर व्हायचे आहे ! कशाकरिता ? त्या पदवीकरिता नव्हे ! त्या धंद्यात रिकामा वेळ खूप मिळतो म्हणून ! माझी सर्वांत मोठी महत्त्वाकांक्षा काय आहे ?-लांब लांब कुठे तरी एक मोठं घर असावं—मग ते भाड्याचं का असेना-तिथे आपल्याला हवी ती सर्वं पुस्तके असावीत-कोरे कागद असावेत-जीवनाकरिता जे मूल्य लागते ते फार थोडक्या श्रमात मिळावे-आणि बौद्धिक आनंदात कालक्रमणा करावी !

—मी किती लिहिलं आहे ?-कितीतरी लिहिलं आहे !

—'मॅट्रिक गाईड'—'इंटर गाईड'-'भूगोल गाईड'—इतिहास—कादंबऱ्या—'इब्सेनचीं नाटकं'-पण ते बहुतेक सगळं ज्ञानाचे वाढप-खरं मला अजून लिहायचं आहे ! वेळ येईल तेव्हा खरी !

निरंतर पुढे म्हणाले—

"असे आहे जोशीबुवा आमचे खाजगी आयुष्य ! आम्ही समजूतदारपणाने वागतो त्याचा अर्थ आम्ही दुबळे आहोत असा काही लोक घेतात !"

'बरं, मग मी आता याचीच मुलाखत तयार करतो !' मी म्हटले.

एकदम एखादी पावसाळी मुंगी चावावी अशा तऱ्हेने व्याकुळ होत निरंतर म्हणाले, 'छेः छेः जोशीबुवा, यात काय सांगण्यासारखं आहे ?'

'—सांगण्यासारखं नसलं तरी याच्यात पुष्कळांना पुनःप्रत्ययाचा आनंद मिळेल ! निरंतर, मी अनुभवाने पण थोडे व्यापक बोलतो. खऱ्या अर्थाने घरी जेवणारे फार थोडे आहेत—वारकरीच फार आहेत ! आणि ज्याला ही अंतरीची जाणीव आहे ती माणसं मी सामान्यातील असामान्य समजतो !'

'पण इतकं खाजगी ?'

'जाऊ द्या हो, दुसऱ्यांची घाणेरडी खाजगी आयुष्यं चव्हाट्यावर मिरवीत असताना या स्वच्छ खाजगी आयुष्यांना निराळंच मोल चढेल !'

'—पण इतक्यात आमचा नंबर कशाला लावता ?'

'त्याचं एक कारण आहे. माझ्या अनौपचारिक मुलाखतीना अनिच्छितपणे जातीयतेचा वास यायला लागला आहे ! आतापर्यंत मी सहा अनौपचारिक मुलाखती लिहिल्या; पण त्या सहाही ओळीनं कोकणस्थांच्याच निघाल्या ! आणि मीही कोकणस्थच आहे हे आपण जाणतांच ! तेव्हा जातीयतेची पहिली पायरी ओलांडण्याकरिता मला कोणी तरी देशस्थ पाहिजे होता. तुम्ही देशस्थ नसलांत तरच फक्त या महिन्यातून तुमची सुटका होईल !'

'मी देशस्थच आहे !' निरंतर नाइलाजाने म्हणाले.

'मग तुमची सुटका करणे आता माझ्या हातातील गोष्ट नाही !'

हे बोलत असतानाच आम्ही निरंतरांचे घरी आलो. निरंतरानी दिवे लावले आणि मी आश्चर्याने थक्क झालो—सकाळी मी जिथे टेबल पाहिले होते तिथे आता कपाट होते ! खुर्च्या होत्या तिथे आता कॉट होती—थोडक्यात म्हणजे सर्व सामानाची अदलाबदल झाली होती !

'हे हो काय निरंतर ?'

'—अरे, परिस्थिती बदलत नाही तर निदान आठपंधरा दिवसांनी सामान तरी इकडचे तिकडे करावे—नवे बिऱ्हाड केल्याइतका आनंद होतो अशाने !' निरंतर हसत हसत म्हणाले.

—आम्ही दोघेही खूप मोठ्याने आणि मोकळ्या मनाने हसलो आणि त्याच तंद्रीत मी घरी परतलो !

* * *

## गोडबोले आणि गोंधळेकर : : : ९

केशवराव गोडबोले यांच्या स्टूडिओत प्रवेश करताच ऐकू आलेल्या मिस्किल आणि मनमोकळ्या हसण्याने मी त्यांना हाक मारायचे विसरूनच गेलो. इतक्या सुंदर हसण्याच्या कारणाचा सुगावा लागावा, म्हणून हाक न मारताच मी गोडबोले यांच्या स्टूडिओच्या बाहेरच्या खोलीत उभा राहिलो. आणि मिनिट-दोन मिनिटांत गोडबोले यांना हाक मारण्याकरिता मी तोंड उघडणार तोच आतून ऐकू आलेल्या काही शब्दांनी माझे तोंड आपोआपच मिटले गेले आणि त्यामुळे मी आल्याची चाहूल आत लागू नये अशी खबरदारी घेत मी बाहेरच्या बाजूला बसून राहिलो !

"काय राजे,-" गोडबोले श्री. छबुराव गोंधळेकर आर्टिस्ट यांना म्हणत होते, "-जोशीबुवा तुमचे अगदी एवढ्या ओळखीचे सांगता-आणि अद्याप तुमची मुलाखत कशी नाही ?"

"अरे बाबा, तसंच आहे ते ! एवढा इंग्लंडला जाऊन 'डिप्लोमा इन् आर्टस' घेऊन आलो, तरी नोकरी-धंद्याचे कुठे नीट जमत नाही-मग मुलाखतीचं इतक्यात कसं जमणार? निदान जोशीबुवासारख्या माणसांनी 'माझे आतापर्यंत का जमले नाही ?' या मुद्द्यावर तरी माझी मुलाखत घ्यायला पाहिजे होती ! सध्या आता ब्रिलियन्ट पिक्चर्समध्ये आर्ट-डायरेक्टर आहे ते सोडा-नाही तर मला जर फ्ल्यूटचा आणि संगीताचा नाद नसता तर डिप्लोमा उशाशी टांगून मी स्वस्थ काळ कसा काढला असता-काय केलं असतं मी कुणाला ठाऊक !"

"मग नक्की तुम्ही लेखक झाला असता ! दुसरे काय करणार ?-बरं, मला आता जोशीबुवा भेटले, तर त्यांना सांगतो हं मी तुमची मुलाखत घ्यायला-" श्री गोडबोले आश्वासन पर शब्दांत म्हणाले. मी आता जरा उत्सुकतेने काचेतून आत पाहू लागलो.

केशवराव गोडबोले उमेदवारांचे अर्ज 'साहेब' जसा वाचतो त्या ऐटीत आणि रुबाबात तेथल्या एका आरामखुर्चीवर बसले. गोंधळेकरांनीही जरा काही तरी रुबाबातच 'पोज' घेतली आणि आपली कॉलर-नेकटाय साफसूफ केली !

"मला तुम्ही असं सांगा, गोंधळेकर-" केशवराव गोडबोले म्हणाले, "तुम्ही खरंच इंग्लंडला गेला होता का येथेच कोठे तरी नैनिताल महाबळेश्वर, भांबुर्डा इत्यादी ठिकाणी दिवस काढून, पत्रव्यवहाराने लंडन 'डिप्लोमा इन् आर्ट स्' मिळविलात ?"

"आपणास अशी शंका यायचे काय कारण ?" आता दोन अधिकाऱ्यांनी एकमेकांच्या चुका काढण्याचा प्रयत्न करावा अशा रुबाबात त्या दोन मित्रांचे बोलणे चालू झाले.

"शंका यायचे कारण म्हणजे असे : आपण परत आल्याला कित्येक दिवस झाले–युरोपचे प्रवासवर्णन अद्याप आपल्या नावावर छापून आले नाही–त्यामुळे जरा शंका येते ! आपला सर्व प्रवास झोपेत झाला काय ? बोला, अद्यापपर्यंत आपल्या नावावर प्रवासवर्णन का छापून आले नाही ?" केशवराव गोडबोले खुर्चीच्या दांडीवर जोराने मूठ आपटीत म्हणाले.

"याचे कारण मी अजून प्रवासातच आहे असे मला वाटते आहे ! ज्या दिवशी आयुष्याला स्थिरता येईल त्या दिवशी प्रवास संपला असे मला वाटेल !" गोंधळेकरांनी काही तरी प्रतीकात्मक उत्तर देण्याचा प्रयत्न केला.

"बरं, गोंधळेकर, इंग्लंडात गेल्यानंतर आपले लोक जास्त धर्मभोळे–भिकार हे आपणास पटले किंवा नाही ? हिंदू धर्मावरील आपला विश्वास–"

"अद्याप कायम आहे ! कारण हिंदुस्थानातच कायम राहणे हे माझे 'ध्येय' होते ! एखादे इंग्लिश पिक्चर जितक्या आत्मीयतेने आपण पाहतो तितक्याच आत्मीयतेने मी इंग्लडमध्ये दिवस घालविले !" गोंधळेकर म्हणाले.

"बरं आपले लोक मागसलेले का राहिले याचे कारण सापडले काय तुम्हांला तिकडे इंग्लंडच्या प्रवासात ? तिथे गेल्याबरोबर अशी कारणं आपल्या लोकांना पटापट सापडतात असं ऐकतो ? बरं, त्यांची संस्कृती विचार–" गोडबोले प्रश्नाचा गोंधळ करू लागले.

पण गोंधळेकर अचंब्याने म्हणाले, "मला नवल वाटतं या दुधखुळ्या

लोकांचं ! हिंदुस्थानात उभा जन्म घालवून हिंदुस्थानाविषयी ज्यांना काही कळत नाही, ते इंग्लंडात जाताच दोन-चार महिन्यांच्या किंवा वर्षांच्या उपऱ्या कालखंडात-बरं, गेलेले असतात कसल्या तरी एखाद्या विषयाच्या अभ्यासाकरिता ! तेव्हा तिथे गेल्यावर-इंग्लंडला दिपून जाणं आणि हिंदुस्थानाबद्दल मत अधिक वाईट होणं यांवरच तिकडच्या युनिव्हर्सिटीच्या पदव्या देतात की काय कुणाला ठाऊक ! काही अजब आहे ! जेवून-खाऊन विडा खात बसलेले तिकडचे लोक-आणि मुद्दाम उपाशी ठेवलेले आपले लोक ! एखाद्या अडचणीत सापडलेल्या किंवा कोंडलेल्या माणसानं श्रीमंताच्या ऐषआरामीपणाकडे थिजलेल्या शरमेनं पाहण्याचं काहीच कारण नाही !"

"वा: वा:, गोंधळेकर, तुम्ही तर अगदी जहाल देशभक्तासारखे बोलायला लागलात ! मग तुमच्या दृष्टीने इंग्लंडात आणि हिंदुस्थानात फरक काय आहे तो सांगा पाहू ?"

"फरक एकच-ते लोक सशस्त्र आहेत; आपण नि:शस्त्र आहोत ! त्यांच्या हातात सत्ता आहे-आपल्या हाती नाही ! म्हणून ते चांगले आहेत-आपण वाईट आहोत ! आणि इतक्या कृत्रिम असाहाय्य परिस्थितीत लो. टिळक-रानडे-सावरकर-गांधी-रवींद्र-रामन्-रे......"

तें गंभीर वातावरण काही मिनिटेच टिकले आणि गोंधळेकर हसत म्हणाले. "त्या डिप्लोमा इन् आर्टस्‌मध्ये थोडा वशिला लावून मी फ्ल्यूट वाजवितो असे लिहून आणले असते, तर मला वाटते, गणेशोत्सवात आणि एरव्ही खूप कार्यक्रम मला मिळाले असते; पण गोडबोले, सध्या परिस्थितीच इतकी कोंडल्यासारखी झाली आहे की कर्तबगारीनं डोकं

वर काढायला जागाच नाही ! एखादा जातिवंत नाग आपले रान आणि बीळ सोडून मनुष्यवस्तीत यावा–म्हणजे तो कितीही जातिवंत आणि पाणीदार असो–मनुष्यवस्तींत एक तो ठेचला तरी जाईल किंवा स्वतःची लहर सोडून एखाद्या टोपलींत त्याला बसावं लागेल आणि एखाद्या 'पुंगाणो' च्या नादावर डोलावं लागेल ! तशी कित्येक कर्तबगारांची गोष्ट झाली आहे. मग मी तर काय.......बरं, गोडबोले, मी इंग्लंडात असताना इकडे आपण काय काय केलेत ?"

"मी एक वर्ष प्रवासात घालविले ! जवळ जवळ सगळा हिंदुस्थान पालथा घातला ! सारखा प्रवास आणि तोही चैनींत चालविला होता ! हिमालयाची उत्तुंग शिखरे पाहिली, काश्मिरच्या नंदनवनातही काही काळ काढला आणि अखेरशेवटी ताजमहालाचे सौंदर्य रोज नवे नवे दिसते असे कळल्यावरून एक वर्ष आग्र्यालाच राहायचे ठरविले ! पण त्याच वेळी माझ्या जवळचा सर्व पैसा संपला ! घरून मागवावा तर तेवढ्याच पैशांत प्रवास आटपावयाचा असे मी माझ्या मनाशी ध्येय ठरविले होते-"

"मग आग्र्याहून परत येताना बिनतिकिटाने प्रवास केलात काय आपण ?" गोंधळेकरांनी विचारले.

"नाही–एका अलौकिक योगायोगाने मला पैसा मिळाला ! की ज्या योगायोगाला मुलाखतीत कर्तबगारीच म्हटलं जाईल ! तो योगायोग असा–"

पण गोंधळेकर गोडबोल्यांचे भाषण थांबवीत म्हणाले-"हे पाहा आता तुमची मुलाखत सुरू झाल्यासारखे दिसते आहे–तेव्हा मी ईझिचेअरवर बसतो आणि तुम्ही उभे राहा–"

—तसे झाले.

"एका चांदण्या रात्री मी ताजमहालच्या चौथऱ्यावर बसलो होतो-- मागे यमुना नदी वाहत होती-वायुवीची यमुना नदीच्या पाण्याशी खेळत होत्या ! माझ्या खिशातले पैसे संपलेले असल्यामुळे आकाशातल्या चांदण्या मला होत्या त्यापेक्षा जास्त दिसत होत्या ! इतक्यात एक धूसर अशी मनुष्याकृती माझ्याच रोखाने धिमेपणाने येत असलेली मला दिसली–माझे केस ताठ झाले पण त्याचा फोटो घ्यावा या इराद्याने मी आपला कॅमेरा सरसावला–पण काही तरी भानात कॅमेऱ्यात भरायची फिल्म मी चांदण्यात अगोदरच उघडून पाहिली–त्यामुळे ती फिल्म फुकट गेली–आणि यमुना नदीला वाहून न्यायला एक छोटीशी चिंधी मिळाली ! तेव्हा मी कॅमेरा पाठीवर टाकून माझ्या खिशातले पिस्तुल बाहेर काढले आणि ते त्या धूसर मनुष्याकृतीवर--"

"काय पिस्तुल ?–काय केशवराव–काल कोणती फिल्म पाहिली होतीत ?"

"ते पिस्तुल साखरेचं होतं ! आग्ऱ्याला जसे चार-चार सहा–सहा आण्याला संगमरवरी ताजमहाल मिळतात, त्याप्रमाणे अगदी खऱ्याप्रमाणे दिसणारी साखरेची पिस्तुलही मिळतात ! सिनेमा कंपन्यांना फार उपयोगी ! इतर पिस्तुलें सीनकरिता वापरल्यानंतर निकामी पडून राहतात ! साखरेची पिस्तुलं वापरली की वाटेल त्या वेळी मोडून खाता येतात ! पण आता तशी पिस्तुले आग्ऱ्यालाही मिळत नाहीत असे ऐकतो ! " नंतर एक थोडासा मोठा उसासा टाकून गोडबोले पुनः पुढे म्हणाले, "तेव्हा ताज-महालात त्या चांदण्या रात्री ती भेसूर मनुष्याकृती माझ्यासमोर येऊ लागली–तेव्हा मी चटकन् ते साखरेचे पिस्तुल त्या व्यक्तीच्या अंगावर

रोखले-तेव्हा ती माझ्याजवळ येणारी व्यक्तीही आपला वेग न थांबविता पण गुदमरलेल्या आवाजाने म्हणाली, 'हात खाली करा !– मित्र !– मित्र ! ! मित्र !!! तुम्हां आम्हाला जे पवित्र असेल त्याची शपथ घेऊन सांगतो, मित्र !-"

"आणि मी पिस्तुलांचा हात खाली केला !"

"ती व्यक्ती आता अगदी माझ्याजवळ आली ! तिचे डोळे कसल्या तरी भावनेने ओलेचिंब झाले होते–एका काळसर झग्याने त्या व्यक्तीचे अंग झांकलेले होते. मी शांतपणाने त्या व्यक्तीचा हात धरीत म्हटले '—आपण कोण आहा ?' मला वाटले काही रोमान्स असेल–पण लष्करी घाटणीच्या पुरुषी आवाजात त्या व्यक्तीने ताजमहालाकडे पाहात म्हटले, 'या चांदण्या रात्री हा ताजमहाल किती भेसूर दिसतो आहे !' आणि हे म्हणत असतानाच त्या व्यक्तीने आपल्या अंगावरचा तो काळा झगा काढून टाकला. आणि-ती व्यक्ती अगदी लष्करी पेहरावात होती त्या व्यक्तीच्या अंगावर तलवार–बंदूक–पिस्तुल सर्व होते.

'ताजमहाल भेसूर दिसतो आहे आपल्याला ? मी काव्यकौतुकाने विचारले.

'हं-निदान आज तरी तो मला भेसुर दिसतो आहे ! काय सांगावं, जर कदाचित् ईश्वरी संकेत असेल, तर हा ताजमहाल मला उद्या सौंदर्य-पूर्णही दिसू लागेल ! पण आपण कोण आहां ?' त्या व्यक्तीने एकदम चमकून माझ्याकडे पाहत व सलगीने माझा एक हात आपल्या हातात घेत म्हटले, 'संकटाच्या वेळी मनुष्य एखाद्या कीडमुंगीपासूनही साहाय्याची अपेक्षा करतो–मी सध्या जीवनमरणाच्या अडचणींत आहे !-कारण–माझी

कर्तव्यबुद्धी ! मी एका संस्थानिकाचा प्रायव्हेट सेक्रेटरी आहे; आणि-प्रायव्हेट मित्रही पण आहे ! आमच्या महाराजांचं एका बाईवर अत्यंत प्रेम बसलं आहे-पण त्या बाईनं एक अट घातली आहे !'

'मला नाही खरं वाटत ! प्रेमाकरिता अडायला किंवा उसासे टाकायला संस्थानिक म्हणजे काय एखाद्या कादंबरीतला नायक आहे ?- संस्थानिक काय वाटेल ते करू शकेल !'

'नाही; पण आमचे महाराज मनाच्या बाबतीत फार हळवे आहेत ! प्रेम-प्रेम ! प्रेम !' मी आणि तो दोघेही प्रसंग विसरून थोडा वेळ ताजमहाल पाहण्यात रंगलो. नंतर पुनः एक उसासा टाकून ती व्यक्ती म्हणाली, त्या बाईचं म्हणणं असं आहे की, चौदा फूट लांबीच्या वाघाची शिकार केलेला फोटो जेव्हा मी तुमचा पाहीन, तेव्हाच मी तुमच्याशी प्रेमबद्ध होईन !–असा वाघ आयत्या वेळी कुठे मिळणार ? खरंच, इतके कलावंत जगात आहेत. कोणी हूबेहुब चौदा फुटी मेलेल्या वाघाचे कृत्रिम प्रेत तयार करून देईल का हो ? वाघनखं आणि सुळे मी मिळविले आहेत !'

'काय मोबदला मिळेल ?' मी अधीरतेने विचारले.

'कमीत कमी पाच हजार रुपये – आणि शिवाय श्रीमंत शिकाऱ्यांना असल्या कृत्रिम वाघांची नेहमी जरूर लागेल. असा जर कोणी कलावंत आपल्या आढळात असला तर अहो वर्षाकाठीं त्याचे असे चार–पाच तरी कृत्रिम वाघ आणि सिंह मी खपवीन शिकारीच्या फोटोकरिता !'

'देव तुमच्या तोंडात साखर घालो ! मी असा वाघ तुम्हांला तयार करून देतो ! मी ताडकन् उठून उभा राहिलो.'

'काय म्हणता ?' त्या व्यक्तीने जवळ जवळ गदगदून मला मिठीच मारली 'चौदा फुटी वाघ ? जीते रहो ! त्याच्या मिशासुद्धा आल्या पाहिजेत हं !'

'हो हो—मिशासुद्धा ! चौदा फुटी ""काय—माझ्याकडून सवा चौदा फूट घ्या !'

'पाणी मिळेल का हो इथे कुठे ? माझ्या घशाला आनंदाने कोरड पडलो आहे !-पण पाण्याने कदाचित् घसा धरेल–साखरेचा खडा आहे काय तुमच्याजवळ ?'

—मी आपले पिस्तुल बाहेर काढले.

तो गृहस्थ चपापला.

'तुम्हांला साखर पाहिजे ना ?' मी विचारले.

'—मग ती काय या पिस्तुलात ठेवली आहे ?'

'छेः छेः, हे पिस्तुलच मुळी साखरेचे केलेले आहे !' मी पिस्तुल मोडून त्याचा एक तुकडा त्या गृहस्थाच्या हातावर ठेवीत म्हटले. आणि नंतर चार-पाच वाघांच्या ऑर्डरी मला मिळाल्या. गोंधळेकरसाहेब, आपण ज्या वाघाच्या मुंडक्यावर हात ठेवून बसला आहां, तो आमचा अगदी पहिला 'ट्रायल पीस' !—गोंधळेकर, आणखी एका कल्पनेचं मला पेटंट घ्यायचं आहे !"

"कोणत्या बुवा ?"

"एखाद्या साप्ताहिकाच्या चित्रपटाच्या किंवा व्यक्तीच्या वाढदिवसाकरिता किंवा अशाच काही प्रसंगाकरिता आता अभिनंदनपर तारा-पत्रे लागत असतात ! आणि ती हुकमी तर काही येत नाहीत. तेव्हा पोस्टाने

जशा सात·आठ आण्यांच्या 'अभिनंदन' तारा काढल्या आहेत त्याप्रमाणे पोष्टाने 'येथे पत्रांच्या तारा करून मिळतील' असे एक खाते उघडावे; म्हणजे काय–माणसाने टाकायचे पत्रच तिकीट लावून; पण त्यावर लिहायचे 'तारेच्या रूपाने धाडावे !' आणि एक आणा जादा लावावयाचा. पोष्टाने ते पत्र फक्त तारेच्या फॉर्मावर लिहून तारेच्या पाकिटातून धाडायचे ! किती उत्पन्न वाढेल पोष्टाचे यामुळे !'' आपल्या अभिनव कल्पनेच्या तंद्रीत आनंदून गोडबोले म्हणत होते !

पण गोंधळेकरांनी त्यांना आयत्या वेळी सुचलेली कल्पना सांगून चीत केले !

''अहो गोडबोले–पण यात पत्रे लिहिण्याकरिता तरी माणसे लागतील–च ना ? ती प्रत्येकाला कशी मिळणार ? तसं नाही उपयोगी. पोष्टाने असं करावं–पाच रुपयात अडतीस तारा आणि चोवीस पत्रं-निरनिराळ्या काल्पनिक गावांची नावं घातलेली आणि निरनिराळ्या–काल्पनिक नावांची–इंगळे-पिंगळे–वागळे वगैरे—जेथे कामुक औषधांच्या जाहिरातींतून एस्. एस्. मुल्ला–तिरुपत्तीहून लिहितात त्याप्रमाणे ! येवढेही तुम्हांला सुचू नये ना ? तुमच्या बुद्धीची हाय हाय !!''

—आणि दोघेही पुनः मोठमोठ्याने हसू लागले—त्यांचे हसणे अगदी पहिल्या थरावर आले. तो रहस्यमय संवाद ऐकून मी तर स्तंभितच झालो होतो—पण थांबा.

ते दोघे पुनः बोलू लागले.

''बस्स, येवढेच पुरे, गोंधळेकर. जोशीबुवांच्या अनौपचारिक मुलाखतीत जे सांगण्यासारखं होतं ते आता सर्व सांगून झालं असल्यामुळे काही

तरी आपण जुळविल्या आहेत तशा चित्रविचित्र काव्यमय खोटया थापा मारल्याशिवाय जोशीबुवांच्या मुलाखती रंगणार नाहीत! 'मोठ्या दगडाखाली विंचू सापडतात-' या आधारावर ज्याला पदवी किंवा पैसा मिळाला आहे अशा कोणाही माणसाला एखादा मुलाखतदार हलवतो; पण त्या प्रत्येकाखाली शहाणपणाचे विंचू वळवळताना कसे दृष्टीस पडणार?"

"बरोबर! बरोबर!!" गोंधळेकर फ्ल्यूट वाजविल्यासारखे मुद्दाम कृत्रिमपणाने मंजुळ बोलत म्हणाले, "आता आपण जी आपली मुलाखत तयार केली आहे—ती जरी घडधडीत खोटी आणि उभयतांच्या विचारे तयार केली असली, तरी त्यात आपली मते चुकूनमाकून आली असतीलच की-आता भेटू देत जोशीबुवा—"

पुन: ते दोघेही हसू लागले.

—मी मुकाटयाने उठून स्टुडिओच्या बाहेर पाऊल टाकले,

-आणि घराकडे वळणार तोच माझी छत्री स्टूडीओत राहिल्याचे मला आठवले, म्हणून मी परत स्टूडिओत गेलो-आणि मोठ्यांदा हाक मारली अहो केशवराव गोडबोले—'

माझा आवाज ऐकून गोडबोले आणि गोंधळेकर दोघेही थोडे गोंधळले आणि दोघेही एकदम बाहेर येत म्हणाले, "का हो जोशीबुवा आज इकडे कुठे?"

'काही नाही—सहज आलो होतो!" मी छत्री काखोटीला मारीत म्हटले.

गोडबोल्याच्या पाठीवर रेलून गोंधळेकरांनी विचारले, "काय जोशी-बुवा, या महिन्याला कुणाची मुलाखत ?"

"अहो, तारीख पंधरा ना आज ?-मग या महिन्याची मुलाखत लिहिणार केव्हा ? त्यातील फोटो केव्हा घेणार ?-त्यापेक्षा असे का करीत नाही तुम्ही ?-हे इथे अनायासे फोटो काढलेलेच आहेत-या फोटोतलीच माणसे का निवडीत नाही तुम्ही या महिन्याच्या मुलाखतीला ?" गोंधळे-कर साळसूदपणाने म्हणाले.

—आणि केशवराव गोडबोले त्यांना साथ देत म्हणाले, "हे पाहा गोंधळेकरांचे फोटो तयारच आहेत. काढू काय खाली ?"

"नको; माझ्या मुलाखतीला अजून अवकाश आहे ! मुलाखतीला लागणारे फक्त पूर्वायुष्य माझे तयार आहे, कर्तबगारी अजून व्हायची राहिली आहे ! नाही म्हणायाला सह्याद्री मासिकाच्या 'सुखी संसार, अंकावरील चित्र काढून मी काही लोकांची धांदल उडविली-यापेक्षा जास्त आमच्या आयुष्यांत काय आहे ?—

"या मोराच्या चित्राने ( पृ. १२८ पाहा ) मला बक्षिस आणि प्रसिद्धी मिळाली पण त्यांतही केशवरावांचे बरेच श्रेय आहे; कारण हे पेंटिंग सबंध माझे आहे-पण त्याचा फोटो या केशवरावांनी काढलेला आहे !" गोंधळेकर निःस्पृहपणाने म्हणाले.

पण गोंधळेकरांना बाजूला सारीत केशवराव गोडबोले माझ्यापुढे मिस्किलपणाने गंभीर चेहरा करून उभे राहात म्हणाले, "खरं पाहिलं तर आता माणसांच्या मुलाखती घेण्यापेक्षा-परिस्थितीची मुलाखत घ्यायला पाहिजे-पण तरी सुद्धा माझी स्वतःची मुलाखत द्यायची माझी तयारी

आहे. या बसा असे ईझिचेअरवर-पाहिल्यांदा मी आपली हकीकत सांगतो; आणि शेवटी कोणच्या मुद्यावर मी मुलाखतीला 'ड्यू' आहे ते नंतर सांगतो. माझे वडोल असिस्टंट कमिशनर होते-तरी अजून मी हॉटेलात जात नाही-चहासुद्धा मी पीत नाही-मग पुढे काय ? तालमीचा लहान-पणापासून नाद-स्नेह्यासोबत्यांचा गोतावळा बेताचाच-सरकारी नोकरीची कधी कल्पनाही केली नाही-सहज फोटोग्राफीचा नाद लागला-तोच पुढे धंदा झाला-कबूल करायला काही हरकत नाही-माझ्या आयुष्याला काही ध्येय नाही ! नदीच्या ओघासारखे आयुष्य-पण प्रवाह संथ आणि धीमा ! आमच्याही आयुष्याचे आम्हांला एक महत्त्व वाटते-गतिमान जगाला त्याच्या हालचाली मोजायला आमची आयुष्ये उपयोगी पडतील ! -माझ्या आयुष्यातील एकदोन प्रसंग सांगतो. माझे वडोल १९३४ साली वारले. त्यापूर्वी पाच वर्षे अगोदर त्यांना अर्धांगवायूचा झटका आला होता. त्यात ते बरे झाले. चालू-हिंडू लागले पण त्यांची वाचाशक्ती अजिबात गेली. तेव्हा माझे विचार आणि बेत वडिलाना समजावून सांगायचे किंवा त्यांचं ऐकायचे हे मला सर्व खुणांनी करावे लागे. मी फोटोग्राफीचा धंदा करायचे ठरविल्यानंतर माझ्या वडिलांनी मला स्टूडिओकरिता स्वतंत्र इमारत बांधून दिली—तेव्हा मी फोटो चांगले काढतो असे सांगितले तर ती मी माझी जाहिरात करतो असे होईल काय ?

"-आणि धंद्याचा म्हणून मी पहिला फोटो काढला तो एका मृत मनुष्याचा ! आणि तो फोटो जिवंत मनुष्यासारखा निघावा अशी त्या मृत माणसाच्या घरच्या माणसांची इच्छा असणे अगदी साहजिक ! म्हणून ते त्या मताला आपुलकीने बसवीत होते-तो जिवंत दिसावा म्हणून त्याचे

डोळे उघडे ठेवण्याचा प्रयत्न करीत होते. कला! कला! कलेच्या फाजील-पणाने माणसाचे फार हाल होतात!

"-दुसरे एका साधारण सौभाग्यकांक्षिणीचा—मी एक सुंदर फोटो काढला—

"आणि एक दिवस तो फोटो हाती घेऊन एक मनुष्य यवतमाळ ते पुणे इतक्या दरम्यानचा जाण्यायेण्याचा खर्च माझ्याजवळ मागू लागला. त्याचे म्हणणे असे होते; 'या तुम्ही काढलेल्या फोटोवर खूष होऊन मी या मुलीशी लग्न ठरविण्याकरिता आलो-पण फोटोनी माझ्या ज्या अपेक्षा निर्माण झाल्या त्या प्रत्यक्षांनी पुऱ्या होत नाहीत-'

"अखेर त्या माणसाचाही मी तसाच एक फोटो काढून दिला आणि ते भांडण मिटविले!

"तसेच आमचे हे गोंधळेकर-एके काळी पुण्यातील छापखान्यांचे 'राजे' अशा घराण्यातील! विचार आणि कला जवळ असून मार्ग नसल्यामुळे आम्ही दोघेही चिडून देशभक्त झालो नाही किंवा बिलकुल वाह्यात वागायला लागलो नाही-या मुद्द्यावर आमची मुलाखत घ्यायला काय हरकत आहे?"

-मला लागणारे फोटो घेऊन व अगोदर त्यांचे झालेले बोलणे मी ऐकले आहे, याचा त्या 'जोडगोळीला' अस्पष्टसुद्धा सुगावा लागू न देता मी घरी परतलो.

—आतां सह्याद्रि मासिकांत ही मुलाखत पाहून त्या दोघांचेही चेहरे अगदीच अनौपचारिक होतील--पण देव भले करो- काही दिवस मी त्यांना भेटण्याचेच टाळणार आहे.

* * *

## प्राध्यापक दत्तो वामन पोतदार : : : १०

वाचक हो, राम राम !

आज बऱ्याच महिन्यानंतर मी माझ्या अनौपचारिक मुलाखतीकरितां पुन: लेखणी हातांत धरीत आहे ! सुरुवातीलाच मी आपणास एक गंभीर घटना कळवू इच्छितो "सह्याद्रि" मासिकात ओळीने प्रसिद्ध झालेल्या माझ्या "अनौपचारिक मुलाखती" माझ्या चिरंजीवांच्या प्रस्तावनेसकट आजच पुस्तक रूपाने विक्रीस बाहेर पडल्या असून-काय सांगावे ? त्याची किंमत अवघी १॥ रुपया आहे ! पुस्तक आजच विक्रीला काढले असून सुद्धा-प्रति फारच थोड्या शिल्लक आहेत कारण की, "युद्धपरिस्थितीमुळे" फारच थोड्या प्रति काढल्या आहेत !

या "अनौपचारिक मुलाखती" लिहायला लागल्या पासून माझी वैयक्तिक परिस्थिती मात्र मोठी गंभीर होत चालली आहे. कै. गडकऱ्यांच्या ठकीच्या लग्नाला निघालेल्या 'बाळक्या आणि मंडळी' च्या वाऱ्याला सुद्धा येण्याचे जसे सज्जन टाळू लागले, त्याचप्रमाणे माझी परिस्थिती झाली आहे !

अलीकडे कोणत्याही समारंभाला जा किंवा चार मंडळींत जा–मला आपले चार हातावर लांब ठेवण्याची समाजाची प्रवृत्ति एकसारखी वाढत आहे ! धास्ती काय ? तर कदाचित् त्या जमलेल्या पैकी एखाद्याची मी मुलाखत घेईन !–आणि मुलाखतीची धास्ती कां, तर मी खऱ्या मुलाखती लिहितो हा माझा अपराध ! त्यावरून माझे मित्र 'स्थानिक स्वराज्य' कर्ते माधवराव जोशी यांचे एक वाक्य मला आठवते, "बा खोट्या, तुझ्यासारखे जगांत खरे कांही नाही !"

सगळ्या लोकांना म्हणे, "खाणावळवाल्याचा गव्हर्नर कसा झाला ?" अशा उत्क्रान्त मुलाखती आवडतात ! आणि मी लिहिणार "गव्हर्नराचा खाणावळवाला कसा झाला ?"

माझ्या मुलाखती म्हणे लोक "नाकमुरडीत" वाचतात, म्हणून सहा महिने "प्रिय वाचकांस" विश्रांती देऊन–पुनः लेखणी हातांत धरीत आहे ! माझ्याबद्दल 'उरल्या सुरल्या' आपुलकीच्या भावनेने वाचकांनी आणखी कांही मुलाखतीचा त्रास सहन करावा अशी नम्र विनंती करून.

प्रा. दत्तो वामन पोतदार हे एक फार सालस गृहस्थ आहेत, असा त्यांच्या बदल एक समज आहे. त्या समजाबद्दल सुरुवातीलाच मी माझा

प्रामाणिक मतभेद व्यक्त करतो. कारण, त्यांच्याकडे मी मुलाखतीकरिता चार-पांच वेळा गेलो; पण एकदाही ते मला एकटे भेटले नाहीत. कमीत कमी चार-पांच माणसांचा तरी गराडा त्यांच्या भोवती असायचाच! आता मुलाखतीकरिता मी येत आहे, हे माहीत असून सुद्धा जो गृहस्थ एकटा राहू शकत नाही–त्याला काय सालस म्हणाल तुम्ही ? निदान मी तरी म्हणणार नाही !

मला दत्तोवामनांविषयी आदर आहे–पण त्याला फारच आपुलकीचे कारण आहे ! दत्तोवामन आणि मी यांच्यात अनेक साम्यें आहेत हे अद्याप फारसे कुणाच्याच लक्षांत आलेले दिसत नाही–तेव्हा ती आता मलाच सांगायला पाहिजेत !

दत्तोवामन डोक्यावर केस राखीत नाहीत-आणि मीही ! दत्तोवामन गंध लावतात आणि मीही ! दत्तोवामनांच्या घरी अस्ताव्यस्त कारभार दिसला ( अस्ताव्यस्तपणांतच त्यांच्या इतिहाससंशोधनाचे बीज असावे कदाचित् )—आणि माझ्याही ! दत्तो वामनांना अजून फार फार लिहायचे आहे आणि मला सुद्धा ! बोलकेपणांत आणि माणसांना घोळत ठेवण्यांत मला वाटते, आम्ही दोघेही कांही एकमेकांना हार जाणार नाही !

आता फरक एवढाच की दत्तोवामन विद्वान आणि व्यासंगी आहेत; आणि मी–पण जाऊ द्या ! ते एक आपले माझे वैशिष्ट्य आहे ! ते आता दत्तो वामनांना मनांत आणले तरी त्यांना जमायचे नाही !

आता करतो हं मुलाखतीला सुरुवात !



पण तत्पूर्वी प्रिय वाचक हा वरचा फोटो पाहिलात का ? ओळखा पाहू कोणाचा आहे तो ? काय, नाहीना ओळखत ? मग मी सांगतो तुम्हाला तो फोटो कुणाचा आहे तो. सर्वप्रिय प्राध्यापक दत्तो वामन पोतदार यांचा फोटो आहे हा ! काय, आपला विश्वास बसत नाही म्हणता ? हा फोटो दत्तो वामनांचा ऐतिहासिक फोटो आहे ! त्यांच्या घरचे जुने फोटो चाळता चाळता मला हा सापडला आणि खुद्द दत्तो वामनांनीच तो फोटो माझा आहे, असे म्हटल्यानंतर 'विश्वास' ठेवल्याशिवाय मला गत्यंतरच नव्हते ! आणि आजची मोठी माणसेसुद्धा ऐकाकाळी लहान असतात या कल्पनेवर जर आपला विश्वास असला, तर हा फोटो दत्तो

वामनांचाच आहे हे आपणांस मान्य करायलाच पाहिजे! ते एक ऐतिहासिक सत्य आहे.

मला दत्तोवामनांविषयी आदर आहे; पण तो भाविक वृत्तीचा आहे लोक त्यांच्याबद्दल आदर दाखवीत आले आहेत—आणि मीही थोडासा रूढिप्रिय असल्यामुळे मीही त्यांच्याबद्दल आदर दाखवितो! लोकमान्यांचे गीतारहस्य न वाचतांच जसा मी त्या ग्रन्थाबद्दल यत्किंचित ही मतभेद न दाखविता आदर दाखवीत आलो आहे. तीच-स्थिती माझी दत्तो वामनांच्या आदराबद्दलची आहे!

बाहेरचा एखादा प्रवासी पुण्याला आला, तर पुण्यास पाहण्यासारखी पर्वती, शनिवारवाडा इत्यादि निरपवाद ठिकाणे आहेत.

त्या प्रमाणे पुण्यांत भेटण्यासारखी जी काही निरपवाद माणसे आहेत त्यांत दत्तो वामन निश्चित आहेत.

—पण पुण्यातले प्रवासी रहिवासी शनिवारवाडा क्वचितच आस्थेने पाहतात त्या प्रमाणे आमची दत्तो वामनांविषयी आस्था: भेटले, आदराने नमस्कार केला; कुठे प्रसंग आला, प्रौढीने त्यांची ओळख सांगितली!

ते कांहीही असले, तरी दत्तो वामनांना इतिहास संशोधनाचा नाद लागला हेच बरोबर आहे असे माझे प्रामाणिक मत आहे. कारण त्यांचा जन्म पुण्या-मुंबईस न होता महाडजवळच्या बिरवाडी गांवीं (जि. कुलाबा) झाला आहे हेच योग्य नव्हे काय? या गांवी दत्तो वामन हेतुपुरःसर जन्मले यावरून तरी निदान—श्री शिवाजीमहाराजांबद्दल ते क्रांति-कारक होते, स्वराज्य संस्थापक होते, का नुसतेच गोब्राह्मणप्रतिपालक होते, अशी आपापल्या तत्त्वज्ञानाप्रमाणे शंकाकुशंका घेऊन, आपापल्या तत्त्वज्ञानाचा जिरेटोप शिवरायांच्या माथी बसावा अशी खटपट चालते,

त्याप्रमाणे—दत्तो वामनांच्या बद्दल काही लटपट होणार नाही अशी मला आशा आहे. कारण, त्यांचा जन्म बिरवाडीस झाला आहे. आणि त्या गांवाबद्दल ज्या अर्थी मला काहीच माहिती नाही, त्याअर्थी बिरवाडीला काहीतरी ऐतिहासिक महत्त्व खात्रीने असले पाहिजे, हे आपोआपच सिद्ध होते !

दत्तो वामनांचा जन्म श्रावण पंचमी ( शुद्ध की वद्य हे पुढे वाद माजण्यास अवश्य ठिकाण असावे, म्हणून मुद्दाम अध्याह्र ठेवले आहे ) शके १८१२ रोजी झाला. सर्व मोठ्या माणसांच्या बाललीला आणि खोड्या सर्वसाधारण एकच असल्यामुळे, मो श्री दत्तो वामनांस त्याबद्दल काहीच विचारले नाही.

महाराष्ट्राला आदरभूत असलेले माझ्या डोळ्यांपुढे दोनच ब्रह्मचारी येतात. एक दत्तोपंत हे हसतमुख ब्रह्मचारी आणि दुसरे ह. भ. प. आणि प्राध्यापक सोनोपंत दांडेकर—की ज्यांच्या आयुष्यात ब्रह्मचर्याची सर्कस झालेली दिसत नाही ! पैकी सोनोपंतांचे ब्रह्मचर्य तेजाळ आणि गंभीर आहे आणि दत्तोपंतांचे ब्रह्मचर्य हसतमुख आहे !

"काहो, दत्तोपंत—आपण राष्ट्राकरिता, राष्ट्रकार्याकरिता ब्रह्मचारी राहायचे ठरविलेत काय ?" मी सुरुवातीलाच जालीम प्रश्न विचारला.

"—नाही—स्वतःकरिताच !" हसत हसतच उत्तर आले.

"कारण ! थोरामोठयांची मुले त्यांचा नावलौकिक त्यांच्या दराऱ्याने पुढे चालवू शकत नाहीत या साधारण सार्वत्रिक अनुभवामुळे ?"

दत्तोवामन नकारात्मक हसत म्हणाले, "ज्यावेळी मी लग्नाला योग्य झालो तो काळ आणि आजचा काळ यांत महदंतर आहे. अगदी

लहानपणापासून माझ्या वडिलांचा आणि इतिहासाचार्य राजवाडे यांचा स्नेहसंबध असल्यामुळे, त्यांचा सहवास मला खूप लागला! आणि त्यांच्या तोंडून बालवयात लखनौ-काशो-दिल्ली-अजमीर इत्यादि नांवे ऐकूनच प्रवासांविषयी माझ्या मनात एक सूक्ष्म आवड निर्माण झाली! आणि पुढे जसजसे शिक्षणाने माझे डोळे उघडून गेले, त्याप्रमाणे माझ्या मनांत काही क्रांतिकारक विचारांचे बीबियाणे पेरले गेले. तसे काही सामाजिक असंतोषही मनांत पेटत गेले. माझे मन इतक्या विचारांनी व्यग्र असे की, लग्नाचा विचार कुणी विचारल्याशिवाय माझ्या मनांत फारसा कधी खेळूच शकला नाही. कुणी विचारले, तर पाहू पुढच्या चैत्रांत' असे मी हसत उत्तर देई—"

"म्हणजे दत्तोपंत—" मी मध्येच घाईघाईने म्हटले 'तुमची इच्छा आणि ताकत असूनही तुमचे नियोजित वाङ्मय जसे लिहायचे राहून गेले आहे, तसेच कार्याच्या आणि विचारांच्या तंद्रीमुळे तुमचे लग्न करायचे ही राहून गेले आहे; येवढाच तुमचा ब्रह्मचर्याचा अर्थ काय?"

तपकिरीची चिमूट ओढीत उत्तर आले, "हं येवढाच! अहो लग्नं करायला पाहिजेतच! मी जरी ब्रह्मचारी राहिलो असलो तरी तसा मी कुणाला उपदेश केलेला नाही! मला वाटलं, मी राहिलो! पहिल्यापासून साधेपणाकडे माझा कल आहे—त्यातंच मला काव्य वाटतं! पूर्वी विद्यार्थी-दशेत आमचं एक मंडळ होत—त्यांत मी पहिला निबंध कशावर वाचला असेल अशी तुमची कल्पना आहे?"

मी माझा अंदाज चुकावा या सद्बुद्धीने विचारले, "सशस्त्र क्रांतीची शक्याशक्यता या विषयावरच ना?"

"नाही ! मी पहिला निबंध वाचला 'पत्रावळी' या विषयावर ! स्वतःच्या पत्रावळी स्वतः लावून त्यावर जेवण्याची कल्पना मला फार आवडते ! त्यात स्वावलंबन आहे—स्वच्छता आहे—कतृत्वचा त्रास नाही ! पत्रावळी ! यावरून गांधीवादाला मी किती जवळ आहे याची तुम्हाला कल्पना येईल !"

"म्हणजे तुम्ही जर एखाद्या राजकीय पक्षाचे पुढारी झाला असतांत –तर गांधीच्या शेळीप्रमाणे तुमच्या पत्रावळीलाही प्रसिद्धी मिळाली असती म्हणायची ! दत्तोपंत--" मी खिन्नपणाने म्हटले "तुम्ही पुढारी न झाल्यामुळे महाराष्ट्र केवढ्या विनोदाला मुकला पाहा ! पण समजा, पत्रावळी विरुद्ध केळीची पानं असा मी मतभेद मांडला तर ?"

"यात मतभेदाला जागा आहेच कुठे ? केळीची पान काही सर्वठिकाणी मिळत नाहीत--पण पत्रावळी कुठेही आणि कशाच्याही लावता येतात !"

"बरं--काही दत्तोपंत, तुम्ही कधी नवाबी थाटाचे कोट घालता तरीही कपाळभर गंध असतेच—कधी खादीच्या रुमालात दिसता—कधी पगडीतही दिसता—या पाठीमागे काही तत्वज्ञान आहे कां ?"

"मला कोणचाही पोषाक चालतो ! पोषाकाबद्दल मी एकच काळजी घेतो की तो फक्त अंग्रजी दिसता कामा नये !"

"कारण—?"

"ते जेते आहेत आणि आपण जित आहोत—आणि असंतोष आमच्या मनांत कायम आहे ! उद्या 'स्वराज्यांत' मी असण्याचा योग आला, तर इंग्रजी पोषाकाविषयीही माझी अढी कदाचित् दूर होईल !"

"पण तुमच्या सारखा माणूस एखाद्या राजकीय चळवळीत पडून एखाद्या

पक्षाचा नेता व्हायचा--तो मास्तर-प्राध्यापक-सुपरिंटेंडेंट या लाइनीला कोठे लागला ?"

"त्याच्याही पाठीमागे फार मोठा इतिहास आहे !" दत्तोपंत म्हणाले, "एक दिवस सहज असा हौदावर अंघोळीला चाललो होतो. वाटेत आपले नूतन मराठीचे विनायकराव आपटे भेटले. त्यांनी थांबवून मला विचारले, "आमच्याकडे एक मास्तर दोन-तीन महिने रजेवर गेले आहेत- तेव्हा तुम्ही येता का ?" मी हो म्हटले - जायला लागलो - आणि तिथेच रमलो"

"तुमच्या या कपाळभर गंधावरून तुम्ही धार्मिक प्रवृत्तीचे मोठे भोक्ते दिसता--आपण अजूनसुद्धा स्नानसंध्या करता काय ?

"नाही—! साधारण मला वाटते--कॉलेज सुटेपर्यंत मी स्नानसंध्या करीत होतो ! पण अजून ही जे करीत असतील त्यांच्याबद्दल मात्र मला आदर आहे !"

"मग हरकत नाही- कारण मी अजून करतो !" मी साळसूदपणाने मध्येच म्हटले.

"एखाद्या बिलोरी आरशावर एकाच वेळेला जशी खूप माणसांची प्रतिबिंबे उठावीत त्याप्रमाणे माझ्या लहानपणच्या आठवणी आहेत ! तुम्हांला आता पहायलासुद्धा मिळणार नाहीत अशा मोठ्या आयुष्यांचा सहवास मला लाभलेला आहे ! आपले अण्णासाहेब पटवर्धन-ते म्हणायचे, संध्या केली की सूर्याला पाणी पोचते. त्या कल्पनेने मी लहानपणी कित्येक दिवस संध्या करीत होतो. मध्ये मला योगाभ्यासाचाही नाद लागला ! आपले समर्थ विद्यालयाचे विजापूरकर—" आयुष्यात निरनिराळ्या वृत्तींची आणि

फार मोठी माणसे सहवासाला लाभली, तर वेळी एखाद्या असामान्य आयुष्याचाही काय गोंधळ होईल या कल्पनेने मध्येच मला हसायला आले !

माझ्या हसण्याकडे दुर्लक्ष करून दत्तोपत्तांचा वाक्प्रवाह चालूच होता. खरी नसून सुद्धां माणसाजवळ पुष्कळ वेळेला मत असतात--तसे माझ्याजवळ दत्तोपंतांविषयी एक मत तयार झाले. तेही अनौपचारिकपणाने लिहून टाकतो.

मर्यादित जागेत सर्व तऱ्हेच्या नामांकित पुष्पांची, आंबे, नारळ, सुपाऱ्या यांची झाडे असावीत--दाटीदाटीने लावावीत—तसे दत्तोपंतांच्या आयुष्याचे झाले आहे असे माझे मत तयार झाले ! कोठल्याही संस्थेत दत्तोपंत असतात--आणि तसे पाहिले तर कुठेच नसतात ! कोणतीही नवीन कल्पना उचलून धरणे--दुसऱ्याला हुरूप देणे--अभिनंदनाची भाषणें करणे--

दत्तोपंताचे भाषण चालूच होते "--कित्येक लोक माझ्यावर मी फार थोड लिहिलं आहे म्हणून प्रेमाने रागवतात पण यशवंतराव मला अजून खूप-खूप लिहायचं आहे—पण फार उत्तम लिहायचं आहे ! पण निरनिराळी कागदपत्रं नेहमी सापडतात—त्यामुळे तयारी संपत नाही –"

मी मध्येच म्हटले, "पण, दत्तोपंत पुनर्जन्मावर माझा विश्वास असला, तरी तुमच्या सारख्यानी विसंबून रहावे असे मला वाटत नाही !'

दत्तोपंत बहुधा विषय डावलण्याच्या हेतूने म्हणाले, "यशवंतराव, वेळापत्रकावर माझा विश्वास नाही ! शिस्त मला मान्य आहे. शाळेतील आठवणी सांगतो तुम्हांला. आपण मारे अेखाद्या विषयांत रंगलेलं असावं विद्यार्थीही तद्रूप झालेले असावेत, विषयही रंगात आलेला असावा-आणि

इतक्यात केवल हेल भरल्यामुळे गड्याने घंटा वाजवावी ! मी कधी क्लास सोडला नाही. माझे समाधान होईपर्यंत पुढच्या तासाच्या मास्तरांची कुचंबणा–वेलापत्रक–ठीक आहे; पण–आणि मी कोणत्याही राजकीय चळवळींत पडलो असतो, तर हमखास अयशस्वी झालो असतो. कारण तिथेही मला वेळापत्रकच आडवे आले असते ! वेळापत्रकाप्रमाणे ऐखाद्या पुढाऱ्याबद्दल आदर दाखविणे, पक्षनिष्ट राजकारणाचा पुरस्कार करणे, मझ्या बुद्धीला आणि वृत्तीला कधीच परवडणार नाही ! गांधीबद्दल मला आदरही आहे—तसा मतभेदही आहे ! इतकी अहिंसा आपल्याला परवडणार नाही ! 'केसरी' बद्दलही माझे काही मतभेद आहेत ! हिंदुस्थानांत-- बृद्धि वगैरे काही कमी नाही ! हिंदुस्थानात कमी आहेत किंवा आमच्या हाती नाहींत फक्त शस्त्रास्त्र ! जगाच्या अितहासात इतके कोटि लोक अशा तऱ्हेने निर्बल आणि निःशस्त्र–अेक अलौकिक चमत्कार वाटतो !"

"बरं, कॉलेजच्या विद्यार्थ्यांबद्दल आपलं काय मत आहे ?"

"ठीक आहेत ! पण आपल्याकडच्या शिक्षणाचा संसारच परिस्थितीमुळे विचित्र झाला आहे !

यस्य कस्य तरोमूलम् ! येन केनापि सिंचितम् ।
यस्मै कस्मै प्रदातव्यं । यद्वा तद्वा भविष्यति ।

या श्लोकाचा अन्वयार्थ आहे : आपले शिक्षण आणि विद्यार्थी म्हणजे !"

"बरं, आचार्य अत्र्यांबद्दल आपलं काय मत आहे ?"

तपकिरीचो चिमूट ओढीत दत्तोपंत मिस्किलपणाने हसत म्हणाले, "तुम्हां सर्वांचे जे मत आहे तेच माझे आहे! मनुष्य बुद्धीचा मूळचा चांगला-"

"नाही, परवा त्यांनी तुमच्याबद्दल आणि काका लिमयांबद्दल फारच चांगल लिहिलं आहे—

"मग अत्रे मनांत आणतात तेव्हा चांगलंच लिहितात् हे सगळ्यांनाच माहीत आहे!—पण असे प्रसंग फार थोडे!"

दत्तोपंतांनी हे बोलत असनाताच जवळचो काही ऐतिहासिक कागद पत्रे चाळायला सुरुवात केली तेव्हा मी विषय बदलला—आणि त्यावरून एक आठवण झाली. माझे स्नेही श्री निरंतर एक दिवस दत्तोपंतांची आठवण सांगत होते. 'कॉलेजमध्ये ऐतिहासिक पत्रव्यवहार हे पुस्तक लाविले होते. दत्तोपंतांनी तासाला सुरुवात केली तोच हसतमुख चिडीने. 'तुम्हांला का शिकवायचे हे पुस्तक? काय समजणार आहे यांत तुम्हांला? या अनुरोधाने आता पर्यंत काय शिक्षण झाले आहे तुमचे? बर, पुढे तरी कोण व्यासंग चालू ठेवणार? इतिहासाचार्य राजवाडे यांनी 'मराठी भाषा मेली' अशा स्वरूपाचे जे विधान कार्यकारी चीड आणि आस्था निर्माण करण्याकरिता केले, हुबेहूब तोच दत्तोपंताचा त्या वेळचा आवेश होता! आणि शिकवायला सुरवात करताच काय दत्तोपंत रंगले म्हणता—"

इतिहासाचार्य राजवाड्यांची परिस्थितिविषयी—म्हणजे परिस्थिती अनुकूल करून घेण्याची शक्यता असूनसुद्धा—निराशपणाने घुमत राहणाऱ्या संभावित वृत्तीची चीड, आणि त्यातही दुर्दम्य आशावाद, निस्पृहपणा, याची ही पुष्कळशी छाया दत्तोपंतांच्या स्वभावावर आहे असे मला वाटते!

आणि दत्तोपंताविषयी आदर जो खूप पसरला आहे तो त्यांच्या हाता-खालून गेलेल्या अमर्याद छात्रगणामार्फत—आणि तो त्यांचा आदर सारखा वाटतो आहे ! त्यांच्या छात्रगणांनीही शाळाकोलेजे सोडली आहेत; दत्तोपंतांचेही सुटले आहे; आणि पुढे दत्तोपंत कार्यरूपानी त्यांना भेटत नाहीत ही त्यांच्या विद्यार्थ्यांची तक्रार आहे ! त्यांचे कित्येक विद्यार्थी माझे स्नेही आहेत—ते नेहमी माझ्याकडे येऊन भुण-भुण लावतात, 'दत्तो-पंतांचे एक तरी पुस्तक तुम्ही प्रकाशित करा, बुवा !"

पण दत्तोपंतांनी लिहिल्याशिवाय मी तरी काय करणार ?

माझ्या प्रकाशनाच्या आयुष्यांतील दोन महत्वाकांक्षा आहेत—दत्तोपंतांकडून आणि दुसरे प्रा० रा० कृ० लागू यांच्याकडून अशी पुस्तके लिहून घ्यायची !

मुलाखत संपविण्याचा हेतूने मी उठलो. दत्तोपंतांना लहानमुलांचा फार शोक आहे. त्यांचा पुतण्या जवळच बसला होता. दत्तोपंतांना आता त्यांच्या मनासारखी एकांतशी जागा मिळाली आहे. आणि आता ते नक्की लिहिणार आहेत विश्वास ठेवा अगर ठेवू नका !

कारण त्या जागेचीही मंडई करणे दत्तोपंतांच्या आणि त्यांच्या चहा-त्यांच्या हातचा मळ आहे !

आम्ही दोघेही त्यांच्या नवीन घराच्या ओटीवर आलो मुलाखत संपल्यामुळे मी जोरांत होतो; मग मी जरा आढ्यतेने दत्तोपंतांना विचारले, "दत्तोपंत, महाराष्ट्राच्या तुमच्या कडून काही अपेक्षा आहेत—त्या तुम्ही केव्हा पुऱ्या करणार ?"

दत्तोपंत तीनमजली हसत म्हणाले, "महाराष्ट्राची अपेक्षा ही काय भानगड आहे ? मला माझे स्वतःचे काही आयुष्य आहे कां नाही ? आणि



बरं आता विषय काढलात म्हणून विचारतो—महाराष्ट्राच्या तुमच्या कडूनही काही अपेक्षा आहेत —होमकुंडाचा अुत्तरार्ध केव्हा लिहिणार ?"

मी विडी पेटविली, आणि दत्तोपंताना नमस्कार करून बाहेर पडलो.

दत्तोपंत !

किती तरी लोक सद्भावनेने त्यांचा निष्कारण वेळ घेतात–आणि एकीकडे आपल्या त्यांच्याबद्दलच्या अपेक्षाही वाढवून ठेवतात ! दत्तोपंत तुसडेपणा करीत नाहीत, हा काय त्यांचा दोष ?--आणि आता असा तुसडेपणाही दाखवायला झाला आहे, हे दत्तोपंतांच्या तरी कधी लक्षांत येणार ?

दत्तोपंतांच्या भोवती इतकी माणसे जमतात तेव्हा ते लोक संग्राहक वृत्तीचे आहेत हे सांगणे नलगे. पण लोकांकडून काम करवून घेण्याचा जो एक लोकसंग्राहक मऊपणा—आपल्या मतांना मुरड घालण्याचा-लागतो तो दत्तोपंतांत कमी आहे असे माझे उगीचच मत झाले आहे !

दत्तोपंतांच्या आयुष्याला मी तीन उपमा देईन. एक उपदेश करीत फिरणाऱ्या रामदासांची साधारण निष्क्रिय आवृत्ती ! दुसरी अखंड तेवत राहणाऱ्या शुद्ध आणि सोज्वळ नंदादीपाची आणि तिसरी वेळीं जळला तरी पीळ न जाणाऱ्या सुंभाची–केवळ नाविन्याच्या मोहाने आपले आकार आणि रंगचेष्टा न बदलता जे योग्य वाटेल ते मतभेदास न जुमानता आचरीत राहण्याच्या त्यांच्या वृत्तीवरून !

त्यांचा मराठीचा जाज्वल्य अभिमान !

"माझ्या मराठीच्या पुरस्काराला हिंदी प्रसाराची मुळीच धास्ती वाटत नाही ! परभाषेचा अभ्यास हा मातृभाषेच्या प्रेमाला मारक ठरला, तर आपले मातृभाषाप्रेम दुबळे आहे असे समजावे. इतर प्रांतिक भाषांचा अभ्यास आपणास उपकारकच झाला पाहिजे ! मराठीची इतर प्रांतात ग्वाही फिरवायची असेल, तर मराठी लेखकांनी प्रांतिक भाषांचा अभ्यास करणे जरूर आहे !"

--आणि अत्यंत चित्त वेधक हसणे पहायचे असेल, तर दत्तोपंताकडे जावे ! त्या हसण्यात चारित्र्याचो चमक आहे !

दत्तोपंतांचे बाळमित्र धोंडूमामा साठे यांनी दत्तोपंत नगर साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष झाले त्यावेळी आपली कामे सोडून नगरला गमन केले. आणि दत्तोपंतांच्या लग्नांत 'करवली पणाचा सोहळा मिळाल्याचे समाधान मानून घेतले. दत्तोपंतांच्या लेखनाची भूक त्यांच्या कित्येक चाहत्यांना आहे; ती त्यांनी कशी पुरून घ्यावी, हे "वाक्पटु" दत्तोपंत आम्हांस समजावून सांगतील काय ?

* * *

# श्री आप्पासाहेब चितळे : : : ११

माझ्या कित्येक गोष्टी मी माझ्या स्नेह्या सोबत्यांच्या आयुष्यांतील प्रसंग ऐकून त्यावरून लिहिल्या आहेत. जिवंत आयुष्यांतून प्रसंग निवडणे मला जास्त बरे वाटते. माझे 'स्नेही ट्रस्ट ऑफ इंडिया इन्शुअरन्स कंपनीचे' श्री देशमुख यांच्याजवळही मी नेहमी म्हणे की, अशी आणखी काही आयुष्यें ऐकायला मिळाली तर मला हवी आहेत ही माझी मागणी श्री देशमुख यांजजवळ आणि माझ्या कित्येक स्नेह्यांजवळ नेहमीचीच असते.

एक दिवस श्री देशमुख माझ्याकडे अचानक आले आणि म्हणाले, 'जोशीबुवा, उद्या सकाळी माझ्याबरोबर मुंबईला चला—तुम्हांला एक फार मोठे आयुष्य ऐकायला मिळेल !'

आणि एवढ्यावरूनच मी नादिष्टासारखा श्री देशमुख यांच्याबरोबर दुसऱ्या दिवशी मुंबईला गेलो.

वाटेंत आपल्याला कुणाला भेटायला जायचे आहे वगैरे नाना प्रश्न

मी श्री देशमुख यांना विचारले—पण आजूबाजूचे अघळ पघळ बोलून देशमुख माझी फक्त उत्कंठा वाढवीत राहिले. मग मीहि देशमुखांचा नाद सोडला आणि अवांतर विषयांवर गप्पा मारू लागलो.

दुपारी जेवण वगैरे झाल्यानंतर देशमुख मला म्हणाले. "चला आता-तुम्हांला त्या माणसाकडे घेऊन जातो."

मीही मुकाट्याने देशमुखांबरोबर बाहेर पडलो. आणि दोन-तीन मजले चढून एका घरात प्रवेश केला. 'बाहेर चितळे' अशी पाटी होती.

"या--या--" आम्ही जातांच एका वयस्क माणसानें आमचे स्वागत केले--पण मला त्यांत आदराचा विशेषसा भाग वाटला नाही. तेथल्या एका खुर्चीवर मी आसन ठोकले. देशमुखांनी त्या वयस्क माणसाची आणि माझी ओळख करून दिली, "हे श्री. य. गो. जोशी--आणि हे नागपूरचे लॉ-रिपोर्टरचे आप्पासाहेब चितळे !" आम्ही दोघांनीहि ऐकमेकांना नमस्कार केला.

आणि नंतर ऐकदम दिवाळींतील चंद्रज्योति उडू लागाव्यात असे झाले. आप्पासाहेब चितळे म्हणाले, "या--या- कराल तितकी स्तुती करून घ्यायचं मी ठरविलं आहे ! या आमच्या देशमुखांकरिता मी हे करायचं ठरविलं आहे ! कुणाची आपल्याला कांही ऋण असतात. काही स्नेहऋणं कांही ऋणानुबंध ऋणं--तसं या देशमुखाकरितां--" आप्पासाहेब चितळे बोलायचें थोडे थांबले आणि कांहीतरी वैचारिक आवेगाने ते टेबलामागे खुर्चीवर बसले होते तेथून उठून अगदी आमच्या समोर येऊन बसले.

वेळ दुपारची होती. उघड्या खिडक्यांमधून तप्त वाऱ्याची झुळूक येत

होती. अप्पासाहेब उघड्या अंगानेच आमच्या समोर येऊन बसले. त्यांच्या वृत्तीतला तो अनौपचारिकपणा मला माझ्या वृत्तीप्रमाणे आकर्षक वाटला. आप्पासाहेबांच्या हातांत धंद्याची पुष्कळशी कामकाजाची पत्रे होती. "जरा एक पांच मिनिटे वेळ आहे ना तुम्हांला ?'' असे म्हणून प्रश्नार्थ दृष्टीने आप्पासाहेबांनी माझ्याकडे पाहिले, आणि माझी संमति गृहीत धरून श्री. आप्पासाहेब पत्र वाचनांत दंग झाले !

मी श्री. देशमुखांकडे पाहू लगलो. देशमुखांनी एक 'सह्याद्रि' मासिकाचा अंक माझ्या हातात दिला आणि ते 'जरा जाऊन येतो' म्हणून गेले. मी सह्याद्रि मासिकाचा तो जुना अंक चाळू लागलो. त्यात मी घेतलेली एक अनौपचारिक मुलाखत छापलेली होती—आणि त्यावरच श्री. देशमुख यांनी खूण करून ठेविली !

देशमुखांचा कावा माझ्या लक्षांत आला. माझे अनौपचारिक मुलाखती हे सदर पुन: सुरू करावे अशी त्यांची इच्छा दिसली ! मी त्या दृष्टीने आप्पासाहेब चितळ्यांकडे पाहू लगलो. आप्पासाहेबांच्या "या - या कराल तितकी स्तुति करून घ्यायला मी तयार आहे—'' या उद्गारांचा अर्थ मला आत्ता समजला. श्री देशमुखांनी श्री. आप्पासाहेब चितळे यांस मी त्यांची अनौपचारिक मुलाखत घेणार असे कदाचित सांगितले असावे !

मी मनांत म्हटले, 'मग बरोबर आहे !

जुन्या चालीचे कांही वृद्ध जसे फोटोग्राफरला टाळीत, पण एखाद्या मुलाच्या किंवा नातवाच्या वात्सल्याला बळी पडून अखेर चिडखोर वृत्तीने फोटोला तयार होत, तशा स्थितीत अप्पासाहेब मला दिसले !

इतक्यांत आप्पासाहेबांचे पत्र वाचून संपले आणि त्यांनी माझ्याकडे

"नको असलेला माणूस सभ्यपणाने कसा परतवावा" या मनस्थितीने पाहिले आणि म्हटले, "—हं बोला काय माहिती पाहिजे तुम्हांला—माझ्या तोंडून कांही संदेश हवा आहे तुम्हांला ? जे मला लोकांनाही मार्गदर्शक होईल असे एक वाक्य सांगतो तुम्हांला—" इतके म्हणून आप्पासाहेब थोडे विचारमग्न झाल्यासारखे दिसले.

माझा अंदाज असा होता की, मला एखादे भगवद्गीतेतील वचन ऐकावे लागणार; पण तसे झाले नाही. आप्पासाहेब चितळे मराठीतच म्हणाले, "प्रत्येक माणसाने आपल्या मृत्युपूर्वी आपल्यासारखाच एक माणूस निर्माण करायला पाहिजे ! आय मस्ट्र क्रिएट् ए व्हो. व्ही. चितळे. गुरूने शिष्य परम्परा निर्माण करणे हा दुय्यम मार्ग--गुरूने गुरुपरंपरा निर्माण करायला पाहिजे ! जो आपल्या कर्तबगारीने गुरूला लाजवील असा शिष्य निर्माण करायला पाहिजे" येवढे म्हणून ती वाक्ये कल्पनेने डोळयांसमोर उभी करून ती कशी काय दिसतात ते बहुतेक आप्पासाहेब स्वतःच पाह्यला लागले. त्यांना तो आपला विचार बरा वाटलासा दिसले, आणि त्याच विचाराने ने रंगलेलेही दिसले !

"या तुमच्या अनौपचारिक मुलखतीतून आता मला काय पाहायला मिळणार आहे कुणास ठाऊक ! बरं, आतापर्यंत अशा मुलाखती मी टाळीत आलो; पण या देशमुखांनी--"

"आप्पासाहेब" मी म्हटले, तुम्ही अजीबात धास्तावू नका--कारण स्तुतीला माझी लेखणी फार कृपण आहे. उत्साहाच्या भरांत मी चांगल्या शब्दांची 'हाराकिरी' कधीच करणार नाही ! मी एक ललित लेखक असल्यामुळे मला 'माणसे' पाहण्याचा फार शोक आहे—आणि अलिकडे मीही स्वतःला धंद्यात गुरफटुन घेतल्यामुळे तीच तीच माणसे पाहून मी

कंटाळलो आहे. म्हणून मी आपल्या स्नेह्यांना नेहमी सांगतो की, एखादा पाहण्यासारखा आणि ऐकण्यासारखा माणुस भेटला, तर मला सांगत जा. म्हणून देशमुखानी आपले नांव मला सांगितले. पण आपली लाखो रुपयांची इस्टेट ऐकून मला वाटले, आपण पाहण्यासारखा हा माणूस नाही !" मी किंचित् आळस देत म्हटले. 'कारण जी माणसे गरिबीतून श्रीमंत झाली त्या माणसांच्या श्रीमंतीला केवळ त्यांची कर्तबगारी आणि सद्गुणच कारण असतात, असे माझे अनुभविक मत नाही. त्यात पुष्कळसा भाग नशिबाचा वा परिस्थितीचा असतो. त्याच्यातही 'गौरव' पाहण्याचे आणि तो लोकांना खिजविण्याकरिता नटवून सांगायला लागणारे 'कवित्व' माझ्याजवळ नाही !" एखाद्या नागाला डिवचावा अशी आप्पासाहेबांची स्थिति झाल्यासारखे मला वाटले. "आणि माझा स्वतःबद्दलचा गैरसमज असा आहे अप्पासाहेब, की कुठही जमलेल्या वैभवाच्या ढिगाऱ्यांनी माझी फसवणूक बहुधा होणार नाही ! फुलांनी झाकून टाकलेल्या अदृष्य देवमूर्तीला पाहून माझे कधीच समाधान होत नाही—वेळी पूजेची फुले बाजूला करून किंवा देव स्नानाला बाहेर निघाले असतील, त्याच वेळी मूर्ति पाहण्याचा मला नाद आहे !"

या माझ्या उद्गारांनी आप्पासाहेब बरेच शांत झाल्यासारखे दिसले; आणि म्हणाले, 'मग मला फारशी धास्ती बाळगण्याचे कारण नाही तर !'"

"बिलकुल नाही ! आणि एकाच भेटीगांठीच्या भांडवलावर मी तुमचे जमले तर वाङ्मयीन पेन्सिल स्केच काढणार आहे--ते साधारण बरोबर यावे, अशी तुमची इच्छा असली तर--''

"मग बोला, काय माहिती पाहिजे तुम्हाला ? मलाही आज माझ्या आयुष्याकडे मागे वळून पाहण्याची इच्छा झाली आहे !"

आणि यालाच मी योगायोग म्हणतो. अप्पासाहेबांच्या वृत्तींत एकदम फरक पडला. त्यांच्या-माझ्यांतले नवखेपणाचे वातावरण एकदम अदृश्य आहे !

आपण मुलाखत देत आहोत आणि मी मुलाखत घेत आहे-ही भावनाही दोघांच्या मनातून अदृश्य झाली. आणि आगगाडीच्या डब्यांत रिकामा वेळ घालविण्याकरितां एकमेक ओळख काढून जशी बोलत असतात–एकमेकांच्या परिस्थितीतला वयातला भेदही त्यावेळी माणसे विसरतात, आणि आपल्या स्वभावाप्रमाणे खुल्या दिलाने बोलू लागतात, त्याप्रमाणे अप्पासाहेब आणि मी काही वेळाचे आणि काही वेळापुरते सहप्रवासी ठरलो.

"माझे नांव वामन वासुदेव चितळे. माझा जन्म कोकणातील आडे या खेडेगांवीं झाला. शिक्षणासाठी आडे, केळशी, अंजर्ले, चिपळूण, दापोली पुणे, नागपूर इत्यादी अनेक गावांचे साहचर्य मला लाभले–त्यामुळे लहानपणापासून माझी दृष्टि संकुचित राहिली नाही ! चिपळूणच्या शाळेत मट्रिक झाल्यानंतर श्री. भा. वि. फडके या सहीने एक पत्र केसरीत प्रसिद्ध झाले होते, त्यात जयपूर, जोधपूर, या शहरी उच्च शिक्षणाची सोय अगदी अल्प पैशांत होते, अशी माहिती प्रसिद्ध झाली होती. जोधपूर कॉलेजमध्ये 'फी' नसे पण इतर खर्चासाठी मला शिकवण्या कराव्या लागत. माझे वडोल भडोचला 'लॉ रेकॉंडंस' रजिस्टेशन खात्यात दरमहा ४० रुपये पगारावर होते. त्या वेळच्या काळमानाप्रमाणे माझे लग्न १९०४ सालीच झाले. आईला व पत्नीला त्यावेळी मी जोधपुरास आणले होते. त्यांत मला खूप शिकवण्या कराव्या लागत. मी बी. ए. त असतांनाच जोधपुरला प्लेग सुरू झाल्यामुळे मी जोधपूर सोडून नागपूरला आलो

आणि १९०७ सालीच बी. ए. झालो.

"नंतर मी नागपूरलाच बोहोरी लोकांच्या मेहेदीबाग स्कूलमध्ये मास्तरची नोकरी धरली आणि एल. एल. बी. च्या टर्म्स भरल्या व १९०९ साली एल. एल. बी. झालो.

'नंतर मी पहिल्याने काटोलला वकिली सुरू केली. तिथे माझे साधारण बरे चालले होते. पण माझे कॉलेज मधील एक सहकारी श्री. बारालिंगे वकिल यांच्या आग्रहामुळे नागपूरला वकीलीकरितां आलो. आणि नागपूरला तीन वर्षे जिल्हा कोर्टात काम केल्यानंतर १९१६ साली मला हायकोर्टाची सनद मिळाली; व १९१६ ते १९१९ पर्यंत सर मोरोपंत जोशी यांच्या हाताखाली ज्यूनियर वकील म्हणून मी काम केले. माझा वकिलीत जमहो चांगला बसला—हजार-अकराशे पर्यंत महिना प्राप्ती होऊ लागली.

"—आणि ज्या कार्यामुळे मी प्रसिद्ध आणि संपन्न झालो तो योग-काहीशा योगायोगानेच-माझ्या आयुष्यांत आला. नागपूर येथील मागील पिढीतील सुप्रसिद्ध वकील रायबहादूर फाटक हे 'सी. पो. डायजेस्ट' या नांवाचे एक कायद्याचे पुस्तक काढीत असत. त्यांच्या चिरंजिवांनी सन १९१९ साली या पुस्तकाची दुसरी आवृत्ति कढण्याचा मला आग्रह केला. मीही पुष्कळच मेहनत घेऊन त्या पुस्तकाचा दुसरी आवृत्ती काढली. त्यात मला आर्थिक दृष्ट्या थोडाही फायदा झाला नाही. फक्त झालेला खर्च परत आला. पण त्या व्यवहारामुळेच मला एक नवीन नजर प्राप्त झाली. आणि आजचा माझा 'ऑल इंडिया रिपोर्टर लि." हा पसारा हा नवीन दृष्टीतूनच निर्माण झाला !

"मला कल्पना आली की, नुसते सी. पी. डाइजेस्ट काढण्यापेक्षा

हिंदुस्थानांतील सर्व हायकोर्टांतील निवाड्यांचे 'डाइजेस्ट' काढले तर या धंद्यावर आपल्यास प्रभुत्व मिळविता येईल. त्यावेळी याही धंद्यांत चढाओढ नव्हती असे नाही. मुंबई-मद्रास-कलकत्ता इत्यादि ठिकाणी प्रांतिक लॉ जर्नल्स व डायजेस्ट निघतच होती. पण सर्व हायकोर्टांच्या निवाड्यांचे अधिक मुद्देसूद व अचूक डायजेस्ट आणि तेही कोर्टे चालू होण्यापूर्वी-वकिलांच्या हाती पडावे. --कल्पना भव्य होती--पण त्याला सुरुवातीला लागणारी रक्कमही त्या वेळी माझ्या डोळ्यासमोर काजवे आणणारी होती--या कार्याला सुरवातीला पाऊण लाख रूपये पाहिजे होते.

"चार पाच ठिकाणी मी या रकमेकरितां शब्द टाकला--त्यातील एकाने सर मोरोपंत जोशी यांजकडे चिठ्ठी पाठवून माझ्याबद्दल माहिती विचारली-सर मोरोपंतांनी त्याच चिठ्ठीवर कळविले की 'आपण श्री चितळे यांना जी रक्कम द्याल त्यास मी जामीन आहे !"

ही हकीगत सांगताना श्री चितळे यांचे डोळे कृतज्ञताभावनेने चमकत होते ! "जोशीबुवा-" चितळे म्हणाले, "घड्याळाचे काटे अचूक काळ-दर्शन करताना दिसतांत; पण तेवढ्याकरितां तबकडीमागे किती यंत्रे राबत असतात ! मला सुरवातीलाच यश आले आणि मी कर्जाऊ आण-लेले पैसे मुदतीपूर्वीच परत करू शकलो ! त्यातील एक रक्कम एका सावकारी पेढी-वरचीच होती. मी मुदतीपूर्वीच पेढीवर आलेला पाहतांच तिथल्या मुनिमाला वाटले की मी आणखी काही रक्कम तरी मागायला आलो आहे-किंवा पूर्वीच्या नेलेल्या रकमेबद्दल मुदत मागायला आली आहे. मुनिमाने सुरुवात केली, 'दिवस फार वाईट आहेत--धंदा मंद आहे--कुळांकडून रकमा वेळेवर येत नाहीत--" त्याचे म्हणणे मी

शांतपणाने ऐकून घेतले आणि नंतर मी सांगितले, "पण मी तुमची रक्कम मुदत भरण्यापूर्वीच परत करावयाला आलो आहे !" माझे हे वाक्य ऐकताच मुनीम तर थंड पडलाच--पण मालकच बाहेर आले आणि म्हणाले, "चितळे रकमेची घाई नाही, आणखी लागल्यास घेऊन चला !" मी म्हटले, "माझ्या जवळ थोडा पैसा रिकामा पडून आहे. आपल्या पेढीवर ठेवीत असल्यास पहा !"

"सर मोरोपंत जोशी यांचा व माझा गुरुशिष्याचा संबंध आहे ! ऑल-इंडिया लॉ जर्नलच्या संपादक मंडळावर सर मोरोपंतांचे नांव असून अद्यापिही त्यांचा सल्ला माझ्या उपयोगी पडतो.

"सर मोरोपंत जोशी यांचा पांच वर्षांपूर्वी ८१ वा वाढदिवससमारंभ मी कृतज्ञतेने घडवून आणला आणि अल्पस्वरूप गुरुदक्षिणा म्हणून प्रतिवर्षी अठरा हजार रुपये उत्पन्न होईल एवढ्या मालमत्तेचा मी ट्रस्ट केला. या ट्रस्टमधून हिंदूधर्म संस्कृति मंदिर व हिंदू-संस्कृतिविषयक संशोधन व्हावयाचे आहे !"

येथपर्यंत आप्पासाहेब चितळे भरवेगांत बोलत होते. एखादी फास्ट गाडी ज्याप्रमाणे फक्त वाटेतल्या स्टेशनांच्या पाट्या दाखवीत आपणाला मुक्कामाला आणून सोडते, त्याप्रमाणे आप्पासाहेबांनी आपल्या आयुष्यातील टप्पे भराभर सांगितले आणि ते एकदम अडखळून म्हणाले, "खरे सांगायचे, जोशीबुवा, म्हणजे माझ्या आयुष्यांत तसे विशेष सांगण्यासारखे काही नाही !"

"बरे, आम्ही जातो आता—आमची चहाची वेळ झाली आहे" मी देशमुखांकडे पाहत म्हटले, यावर आप्पासाहेब केवढ्यांदातरी हसले. त्यांनी टेबलावरची घंटा जोरजोराने वाजविली. आपल्या मुलीला हांक

मारली, "अग, चहा, आण करून लवकर दोन कप आणि त्याच्याबरोबर खायलाही काही ! माझे हे असे होते, जोशीबुवा मी चहा घेत नसल्यामुळे--पण तुमची वेळ होऊन गेली."

नंतर आमचे चहा-खाणे होईपर्यंत आम्ही मोकळेपणाने खूप गप्पा मारल्या. आणि त्यात आप्पासाहेब माझ्या दृष्टीने मला जितके कळले तितके त्यांनी स्वतः हकीकत सांगायची म्हणून जी सांगितली त्यातही कळले नव्हते !

आणि या सर्व प्रसंगांत एक गंमत अयाचितपणे होऊन गेली होती. "कथाप्रसंग" सांपडावेत म्हणून मी आयुष्य ऐकतो. त्या करिता मी मित्रांना विनंती करतो--त्याचप्रमाणे मी देशमुखांनाही केली होती. देशमुखांना वाटल मला अनौपचारिक मुलाखतीकरितां माणूस हवा आहे म्हणून. आप्पाहेबांना त्यांनी तसे सांगितले आणि मग मी मनाशी ठरविले, "अनौचपारिक मुलाखत नव्हे पण आप्पासाहेबांचे आपण एक पेन्सिल स्केच लिहावे म्हणून ! आणि मग मी स्वतः आप्पासाहेब चितळ्यांबद्दल माहिती गोळा केली.

ऑल इंडिया डायजेस्टची कल्पना आप्पासाहेबांनी एकदा मनात घेतल्यावर, त्या कल्पनेची वाढ त्यांनी झपाट्याने आणि मेहनतीने केली आणि त्यात त्यांना यशही चांगले आले. पाहिली पहिली प्रकाशने त्यांनी मद्रास येथे छापून घेतली. नंतर नागपूरास स्वतः छापाखाना सुरू केला. आज त्या छापखान्याचे स्वरूप आणि यंत्रसिद्धता नागपूरच्या सरकारी (गव्हर्नमेंट) मुद्रणालयापेक्षाही श्रेष्ठ दर्जाची आहे.

आप्पासाहेबांच्या छापखान्याची आणि त्यांच्या इमारतींची किंमत आज कित्येक लाखांवर आहे ! त्यांच्या छापखान्यातील दोन मुख्य

अधिकाऱ्यांचे पगार प्रत्येकी दरमहा हजार रुपये असून, मुख्य मॅनेजरचा पगार दरमहा चार हजार रुपये म्हणजे कार्यकारी मंत्र्या ( गव्हर्नमेंट एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर ) इतका आहे ! छापखाना वगैरे चालू ( प्रेस व एस्टॅब्लिशमेंट ) खर्च प्रतिवर्षी तीन लाखांवर आहे. छापखान्याचा फक्त टपाल खर्च दरसाल पन्नास हजार रुपये आहे !

आपल्या धंद्यातील चढाओढ बंद करण्याकरितां मद्रास, कलकत्ता यासारख्या ठिकाणच्या याच व्यवसायांतील प्रकाशन संस्था आप्पासाहेबांनी सर्वस्वी विकत घेतल्या !

आप्पासाहेब चितळ्यांचे धंदेवाईक व्यवहाराचे अडाखेच काही निराळे आहेत. त्यांना वाटते माणसाला त्याच्या लायकी इतकाच पगार दिला तर त्याला आपल्या कामात आस्था वाटणार नाही !; म्हणून आप्पासाहेब नेहमी माणसाच्या कर्तबगारीपेक्षा त्याला दुप्पट वेतन देतात आणि असा पगार देऊनही आप्पासाहेबांच्या मालकीच्या ऑल इंडिया रिपोर्टरच्या मालमत्तेची किंमत आज पन्नास लाखांवर आहे.

आप्पासाहेब चितळे इन्कमटॅक्स जितका भरतांत त्याच्या सव्वापट रक्कम ते इन्कमटॅक्सतज्ञ म्हणून मिळवितात. शासनसंस्थेने मान्य केलेल्या कायदेशीर मार्गाने शक्य तेवढे कमी कर शासनसंस्थेस भरणे हे केवळ न्याय्यच नव्हे तर ते प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य आहे असे आप्पासाहेबांचे मत आहे !

मुख्य धंदा म्हणून 'ऑल इंडिया रिपोर्टर' चा धंदा करून आप्पासाहेब खेळाडू वृत्तीने इतर धंद्यांशीही खेळले आहेत. "वधूवर सूचक मंडळ" म्हणून लग्नाच्या मुला-मुलींची साधार माहिती मिळवून विवाह जुळवि-

ण्यातील सामाजिक त्रास कमी व्हावा या कल्पनेने त्यांनी जवळ जवळ सत्तर हजार रूपये खर्च केले-पण त्या धंद्यात कोणी योग्य समानधर्मी न भेटल्यामुळे तो व्याप आप्पासाहेबांना बंद करावा लागला.

"साडी मार्ट" म्हणूनही त्यांनी एक उद्योग करून पाहिला, त्यातही आप्पासाहेबांना कित्येक हजारांची ठोकर बसलो ! हे कळल्यानंतर मला "गुरूने शिष्य निर्माण न करता गुरुपरंपरा निर्माण करायला पाहिजे. आय मस्ट क्रिएट ए व्ही. व्ही. सी. – मी एक व्ही. व्ही. चितळे निर्माण करायला पाहिजे !" या आप्पासाहेबांच्या वाक्यातील मर्म ध्यानात येते; पण त्यावर मला असे म्हणावेसे वाटते की "आप्पासाहेब, यू मस्ट क्रिएट ए व्ही. व्ही. सी. वुइथ ड्यू करेक्शन्स अँन्ड नेसेसरी अँडिशन्स !"

श्री. आप्पासाहेबांचा वैयक्तीक प्रपंचही सुखाचा आहे. त्यांना आज सात मुलगे आणि एक मुलगी आहे. आप्पासाहेबांचे वडील चिरंजीव दिनकरराव हे बी. ए., एल् एल्. बी. असून एल् एल्. बी. च्या परिक्षेत नागपूर युनिव्हर्सिटींत फर्स्टक्लास फर्स्ट आले. पुण्याचे प्रो. दीक्षित यांच्या कन्येबरोबर दिनकरावांचा विवाह झाला आहे. विवाह समयी दिनकररावांची पत्नी फक्त मॅट्रीक होती. आज एम. एस्सी. आहे. आप्पासाहेबांचे दुसरे चिरंजीव दिवाकरपंत हे बी. ए असून पुढील शिक्षणाकरितां विलायतेला होते – पण चालू संपून गेलेल्या महायुद्धामुळे त्यांना परत यावे लागले. दिवाकरपंत हे मुंबईचे श्रीमान वामन श्रीधर आपटे यांचे नातजावई हे दोघेही 'चिरंजीव' आप्पासाहेबांच्याच धंद्यात आहेत.

मुलं-मुली-सुना आणि पत्नो यांच्या समवेत रोज एकत्र बसून एक-

मेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढण्याचा आप्पासाहेबांना शोक आहे. आपल्या पत्नीबद्दल आप्पासाहेबांना फार कृतज्ञता वाटते. त्यांच्या पत्नीच्या स्वभावाबद्दल जेव्हा मी त्यांच्याजवळ विषय काढला, तेव्हा आप्पासाहेबांच्या डोळ्यांत कृतज्ञतेचे अश्रु उभे राहिले. त्या अश्रुंचे भाषांतर शब्दांत करण्यास मी असमर्थ आहे-आणि आप्पासाहेबांना ते जमणार नाही असे मला वाटते !

या उतारवयातही श्री आप्पासाहेब चितळे जरी अजूनही तारुण्याच्या उत्साहात दिसतांत, तरी माझ्या दृष्टीला 'आपल्या आयुष्याचा दिवस आता कलला आहे' याची जाणीव आप्पासाहेबांच्या हृदयांतरी खेळत असल्यासारखे मला वाटले. कुटुंबाकरितां चार-पांच पिढ्यांचे मिळविले आहे. आता त्यांना वैयक्तिक स्वार्थ उरलेला नाही. पण स्वस्थ बसणे ही आप्पासाहेबांची वृत्तीच नाही ! त्यांनी आता विशाळगड संस्थानात हिरड्यापासून 'टॅनिन' काढण्याचा कारखाना सुरू केला आहे. आणि त्याकरिता स्वतःच्या इस्टेटीच्या तारणावर नवीन भांडवल ते उभे करीत आहेत !

आप्पासाहेबांचे 'मनोराज्य' बहुतेक असे असावे, "अंबा घाटांतील त्या चार एकर जमिनींत बसविलेल्या या नवीन कारखान्यांत ज्या अंबा घाटाला वनश्रीचे सौंदर्य अगोदरच मुबलक आहे तेथे कामगारांच्या वसाहती जवळच, हिंदुधर्म-संस्कृति-मंदिर' या संस्थेची लायब्ररी व कचेरी ठेवून आपले उर्वरित आयुष्य मनन-चिंतनात व्यतीत करावे."

आप्पासाहेब चितळे !

एक हुषार दीर्घोद्योगी आणि चिकाटीचा माणूस. कार्य करणे येवढेच

माहीत. यशापयशाची दाद न बाळगणारा. "ऑल इंडिया रिपोर्टर लिमिटेड' या आयुष्यांतील उद्योगांत अपरंपार यश आल्यामुळे आपण म्हणू तेच खरे' अशी थोडीशी ऐककल्ली विचारसरणी असणारा-कर्तव्य-कठोर माणूस. वृत्ति थोडीशी तडतडीच. बोलण्यांत फार स्पष्ट; त्यामुळे आप्पासाहेबांची चितळ्यांची इच्छा नसतानासुद्धां-तिऱ्हाइताला अपमानास्पद वाटावी पण अशी माणसे ज्यांनी पाहिली आहेत त्यांना त्यांच्या वृत्तीचा प्रेमळपणाही प्रतीत व्हावा—आणि हा खळखळाट वरवरचा आहे—सहकार्याला फार चांगला माणूस—कृतीने हिशेबी, उदार ! वृत्तीने प्रामाणिक पण धंदेवाईक. आपली चूक कोणी दाखविली आणि ती स्वतःल पटली तर त्यांत आनंद मानणारा. " ही चूक आहे--आणि माझे चुकलेच बरं का !" अशी खेळीमेळीची वृत्ति. व्यवहारिक वानप्रस्थाश्रमाची कल्पना-आपण मिळविले आहे ते पुरे आहे. आपण कुठेतरी थांबायला पाहिजे, हे जाणून आपल्या पुढील मिळकतीचा आणि पूर्वी मिळविलेल्यातील काही वाटा आगोदरच समाजकार्यी दिलेला. एका वाक्यात सांगायचे तर आप्पासाहेब चितळे, म्हणजे मला "वऱ्हाडचा पाटील !" वाटले.

साठी उलटल्यानंतरही तरुणोन्मादक अशीच वृत्ती ! कोणत्या तरी कार्यांत गढून जाणे हीच कामाची आणि विश्रांतीची त्यांची कल्पना ! नियमित वागणूक आणि आहार. अत्यंत सुखी कौटुंबिक आयुष्य. कोणत्याही कार्याला 'सर्वस्व पणाला' लावण्याची त्यागी आणि थोडीशी आततायी वृत्ती.

थोडक्यांत सांगायचे तर एक शिकारी वृत्तीचा गृहस्थ आहे—पण मृगया नव्हे—सिंह-वाघांशी झुंजावे, मृगांना आडोसा द्यावा-मृगयेत फार

झाले तर 'मृगया' मिळणार नाही—पण स्वतःच्या जिवाला धोका नसतो—पण आप्पासाहेब चितळ्यांचा स्वभाव शिकारी आहे!—आणि त्यांत फाजील आशावाद नाही. आपली नेमबाजी अनुभवाने अचूक ठरली म्हणून जवळ 'अपुरा' साटा घेऊन शिकारीला बाहेर पडणारे नव्हेत—एका व्याघ्राची शिकारी करावयाची असेल, तर दहा वाघांच्या शिकारीच्या तयारीने जायचे !

* * *

# रावसाहेब र. लु. जोशी : : : १२

"म्हातारा" आणि "पेन्शनर" हे दोन शब्द विनोदाची खसखस पिकवायला हल्ली खास उपयोगी पडत असतात. पण मी अशा म्हाताऱ्याची आणि पेन्शनरची मुलाखत घेतो आहे की त्या म्हाताऱ्याकडे पाहून केवळ आपल्याला थोडे दिवस झाले म्हणून स्वतःला तरुण म्हणवून घेणाऱ्या विदूषकांना रावसाहेब र. लु. जोशांसारखा प्रामाणिक म्हातारा होण्याची तळमळ लागावी !

तो माझ्या दृष्टीने 'आदर्श म्हातारा' म्हणजे रावसाहेब र. लु, जोशी हे होत. होता होईल तो कोणत्याही संस्थेचे सभासद व्हायचे नाही असे माझ्या आयुष्याचे एक बारकेसे ध्येय होते. पण रावसाहेब र. लु. जोशी या म्हाताऱ्यापुढे मला 'यशस्वी माघार' घ्यावी लागून 'साहित्य परिषद' चा मी सभासद झालो आणि त्याच जोरावर, माझ्या "अनौपचारिक मुलाखती"तून निसटू पाहणाऱ्या या म्हाताऱ्याला--

"अरे, काय जोशीबुवा, आमच्यावर का धाड तुमची,--अरे मला सोडवाना तुमच्या मुलाखतीतून ! आम्ही अस काय केलं आहे तुमचं ?" रावसाहेब अत्यंत केविलवाणे म्हणाले.

"काय केलं आहेत ?" मीही जरा चढ्या स्वरातच विचारले. "मला साहित्य परिषदेचा सभासद कोणी करून घेतलं ? बरं, घेतलंत ते घेतलंत आणि वर्गणीही वसूल करतां ? भोगा आता त्याचे प्रायश्चित्त !" मी सूडाच्या समाधानाने म्हटले.

"अरे, पण आम्ही नाही मुलाखत दिली तर ?"

"रावसाहेब, माझ्या घरी येऊन मुलाखत द्याल ! फक्त साहित्य परिषदेकरिता चार नवीन सभासद मिळणे शक्य आहे असे तुम्हांला दाखवायला पाहिजे ! आणि खरं सांगू का, रावसाहेब, तुमची मुलाखत लिहिण्याकरितां मला तुमच्याकडून काही माहिती नको आहे ! माझ्या कांही मुलाखतींचे हेच वशिष्टय राहणार आहे की मुलाखती करतां "मुलाखित" व्यक्तीला फारच थोडे विचारणार आहे—आणि त्याची माहिती मी आजूबाजूला चौकशी करूनच जास्त काढणार आहे ! आता माझ्या या विचित्रपणामुळे "मुलाखित" व्यक्तीवर क्वचितच आश्चर्याने पाहण्याचा प्रसंग येणार आहे ! पण मुलाखत म्हणजे धक्के देणारी—मुलाखित व्यक्तीला सामान्य माणसांतून बाजूला काढणारी असायलाच पाहिजे ! तेव्हा रावसाहेब मला तुमच्या बद्दलची सर्व माहिती मिळाली आहे—मला फक्त आपली परवानगी पाहिजे !"

माझे हे भाषण ऐकून रावसाहेब एकदम चिंतातुर झाले. त्यांनी आपल्या हातांतील छत्री एकदम जमिनीवर उभी करून त्यावर आपल्या

दोन्ही हातांच्या पंजाचे पारवे तयार केले आणि त्यावर आपले डोळे स्थिरावले आणि एक दोन मिनिटातच एकदम मनमोकळे हसत ते म्हणाले, "आलं जोशीबुवा लक्षांत—माझी माहिती तुम्हांला कोणी सांगितली ती !—आमच्या विठ्ठलराव घाटयांनी सांगितली असेल ! अरे, ते काय माहिती सांगणार. रावसाहेबांना आपले स्वत:चेच हसणे आवरेना.

"अहो, जोशीबुवा—विठ्ठलराव घाटे फार मिस्किल माणूस आहे–त्यांच्यावर भरवसा ठेवू नका तुम्ही ! त्यांची मुलाखत घेणार असला तर मग त्यांची माहिती मी सांगेन तुम्हांला ?"—बर माझ्या मुलाखतीबद्दल त्यांनी काय काय सांगितलं तुम्हांला ? रावसाहेबांनी साळसूदपणाने विचारले.

"ते आता तुमची मुलाखत छापून आली म्हणजे वाचा तुम्ही !" मी गंभीरपणाने म्हटले.

"हं-मी सांगतो तुम्हाला, मी कविता करतो आणि फाडून टाकतो–हे सांगितलं का त्यांनी तुम्हाला ? हे सांगितल्याशिवाय रहायचे नाहीत ते ! जोशीबुवा, मला लहानपणापासून कवितेची खूप आवड. मुक्तेश्वर, श्रीधर वाः वाः तुम्हाला माहित नाही जोशीबुवा–माझी स्वत:ची दोन-तीन हजाराची लायब्ररी आहे. मी कविता केल्या खूप पण त्या छापून वाचकांना त्रास नाही दिला–केवळ मी माझ्या मनाच्या समाधानाकरितां करायचा आणि फाडून टाकायचा ! त्यातल्या काही काही ओळी अजून आठवतात मला-" रावसाहेब आपल्या आठवणीतल्या कवितेचे चरण गुणगुणू लागले.

कुठे हा निनाद भंवती उठे

आणि आमच्या लक्ष्मीबाई टिळकांच्या क्रिस्तायनांत माझाही भाग आहे थोडा–

दिसे वरती नीळे अंबर। रजताऽभ्राची तया झालर !
फुले चांदवा असा सुंदर। विश्वेश्वर आगमना ऽ ॥

किंवा

मातृहृदयम्बे मापन। मातेविना करी कोण ?
इतरेजनाऽकाय सांगून। ये उमजून मायमाया ! ॥'

रावसाहेबांचे म्हणत असलेल्या काव्यचरणापेक्षाही रावसाहेब ज्या तल्लीन वृत्तीने ते काव्य चरण म्हणत होते, त्याची मोहिनी माझ्या मनावर जास्त पडली-त्यांतच मला खरे काव्य वाटत होते. रावसाहेबांचे काव्य-गायन आपोआपच थांबले. आणि ते काहीतरी तंद्रीतच वर छताकडे पाहू लागले.

तेव्हा मी हळूच विचारले, रावसाहेब, वय काय तुमचे ?"

'अरे अडुसष्टावे वर्ष लागले आम्हांला-आहेत कुठे आमच्या जोडीचो फारशी माणसे ? पेन्शने होऊन अकरा वर्षे झाली मला ! अहो, पण आमची कशाला विनाकारण मुलाखत घेत आहांत तुम्ही ? असं काय आहे आमच्या आयुष्यांत ? मला चार मुलगे आहेत आणि एक मुलगी आहे-चार मुलगे मिळवते आहेत—मुलगी–तिचही लग्न झालेल आहे-ती आपल्या मुलाबाळांसुद्धा आपल्या घरी आहे; जावई माझे डॉक्टर असतात माझे विकाराबादला ! मी माझी औरस मुलं आणि आणखी एक मुलगी आहे मला. मी संभाळली आहे तो—झाली आज आठ-दहा वर्षे—त्या मुलीचे आईवडील वारले—नातेवाईक कुणीच नाही —आता माझीच

मुलगी मी—माझे भाऊ मात्र अमेरिकेत वगैरे होते–आता भाऊ-कोणी राहिला नाही–कॅप्टन जोशी ऐकून माहीत असतील तुम्हांला ?–एक डॉक्टर होते–एक प्रोफेसर होते, पण बिचारे सगळे ! अहो, मला काय कमी का होतं ? पांचशे साठ रुपये पगार होता मला मी पेन्शन घेतलं तेव्हा–पण आमच्या भावांनी चीन—जपान मधून ५०/६० रुपयांच कापड मला होऊन पाठवलं होतं—यांतली गंमत नाही कळायची तुम्हांला—ते कापड अजून आहे – पण भाऊ निघून गेले !" रावसाहेबांचे पूर्वायुष्य त्यांच्या डोळ्यासमोर नाचू लागले होते.

"हे आमचे आयुष्य—याची का मुलाखत होणार आहे ? तेव्हा मी सांगतो तुम्हांला—आमच्या मुलाखतीचा नाद सोडा तुम्ही यशवंतराव !" रावसाहेब अगदी अक्षरशः माझ्यापुढे हात जोडून म्हणाले.

"पण रावसाहेब", मी गंभीरपणी म्हटले, "माझी माहिती अशी आहे की, आपण पोस्टखात्यांत २५ रुपयांवर नोकरीला लागलात—आणि नंतर आपण साडेपांचशे रुपयांपर्यंत बढती मिळविलीत—शिवाय मोटार अलाऊन्स—रहायला बंगला—"

"अहो मग यशवंतराव, याकरिता पोस्ट-खात्याची मुलाखत घ्यायला हवी तुम्ही ! पोस्टखात्याने आतापर्यंत माझ्यासारख्या किती तरी लोकांना पंचवीस रुपयांवरून पाचशे—आठशे, हजार-बाराशे–अशी प्रमोशनं दिली आहेत ! त्याचं अस आहे यशवंतराव, मोठ्या पगाराच्या जागा थोड्या असतात—त्यामुळे काही लोकांना अशी प्रमोशनं मिळतात !' हां—आतां खर सांगतो यशवंतराव तुम्हांला—एक मात्र आहे माझ्या बाबतीत सांगण्या सारखे—इतकी नोकरी केली—तरुण होतो नोकरीत

तेव्हा मित्रासारखा वागलो सगळयांशी; पुढे वयाने आणि अधिकार.ने मोठा होत गेलो–तसा मोठ्या कुटुंबातील 'दादा' असावाना, तसा वागलो सगळ्यांशी. आणि सगळे माझ्याशीही तसेच वागले. खरी नात्याची माणसे सोडली तरी ऋणानुबंधाने—अनेक मुलंमुली—भाऊ बहिणी आहेत मला'' एखाद्या भगवद्‌भक्ताने पंढरीच्या विठूच्या कीर्तनाला उभे राहावे, त्याप्रमाणे रावसाहेब जवळ जवळ आपल्या स्वतःच्या कीर्तनाला उभे राहिल्यासारखे मला वाटले. तो म्हातारा गडी आपल्या आयुष्यातील पूर्वस्मृतीत रंगला होता. आणि आपल्या आयुष्यातले काय बोलावे—किती बोलावे –पण अनेक आठवणींनी त्यांच्या मनाच्या आंगणांत गर्दी केल्यामुळे त्या आठवणींतच ते तल्लीन झाले वाटते आणि बोलायचे आपोआप थांबले !

"पण रावसाहेब, मराठी भाषेविषयी इतका जिव्हाळा तुम्हाला कसा-उत्पन्न झाला ? रावसाहेबांना पुन्हा बोलते करण्याकरिता मी काही तरी प्रश्न टाकला.

"असं विचारा मी सांगतो तुम्हाला ! पण त्या विट्ठलराव घाटयांवर विश्वास ठेवू नका ! अहो माझ्या विषयीच्या आपलेपणापायी—खूप आकाशात भराऱ्या मारल्या प्रमाणं—'रावसाहेब, ते तुम्हांला खूप मोठा करून दाखवितील ! मी सांगतो तुम्हांला—

"—पण मला बिठ्ठलराव घाटयांनी सर्वं सांगितलं आहे—आणि मला ते पटलं आहे !" मी म्हटले.

"—मग मराठी बद्दल मल इतका आपलेपणा का वाटायला लागला हे सांगितल नाही त्यानी तुम्हाला ? हं, हं, आता आले ''लक्षांत विट्ठल-

राव घाटयांच नाव पुढे करून सर्व माहिती माझ्याकडून काढीत आहांत् तुम्ही ! पण अस खोटं मला नाही आवडत—मी सांगतो तुम्हाला-त्याचं अस झालं—पोस्टखात्याच्या माझ्या नोकरीनिमित्त मला कराची, लाहोर, बसरा इकडे खूप दिवस काढावे लागले—आणि तिथे मराठी ठीलण्याचे प्रसंग अत्यंत कमी—घरीच काय बोलू तेवढे—कस चुकल्या चुकल्या सारखं वाटायचं पाहा-आपल्या देशांत राहुन मायबोलीचे महत्व कळत नाही. अहो, माय बोली म्हणजे ऑक्सीजन सारखी आहे !—सिमल्याची गंमत सांगतो तुम्हाला—एकदा सिमल्याला गेलो होतो एकटाच—आणि तिथे दोनचार दिवसात मराठी बोलायला सापडलं नाही अजीबात ! मला काही चैन पडेना—अखेर जिथे उतरलो होतो तिथं विचारलं, इथं, मराठी बोलायला कुठे सापडेल हो ?--आणि कळलं की तिथं घाणेकर म्हणून एक गृहस्थ आहेत--बरं, त्यांची माझी ना ओळख ना पाळख घाणेकराचा पत्ता विचारून घेतला--आणि दुपारच जेवण झाल्याबरोबर-लगेच बाहेर पडलो—मराठी बोलायला म्हणून—आणि घाणेकरांच्या बंगल्यात—ते झोपले होते—मी काहीतरी आवेगानेच दार ठोठावले—घाणेकरांची झोपमोड झाली ते झोपमोडीमुळे किंचित रोषानेच माझ्या-समोर येऊन उभे राहिले, आणि त्यांनी मला विचारले, "काय पाहिजे तुम्हाला ?" मीही आवेगाने म्हटले "मला दुसरं काही नको आहे, मला मराठी बोलायला पाहिजे—आज चार दिवस झाले ! मराठी बोलायला सापडल नाही कुठे—इथ बोलता येईल अस कळलं म्हणून धावत आलो"—आणि काय सांगू जोशीबुवा तुम्हाला—कदाचित् खोट वाटेल तुम्हाला—आम्ही अेकमेकांना कडकडून मिठी मारली ! मायबोली बद्दलचा जिव्हाळा

असा विलक्षण असतो ! कोणत्याही गोष्टीचा उपास घडला--म्हणजे तिचे खरे महत्व कळते !"

रावसाहेब बोलायचे मधे एकदमच थांबले –आणि लगेच थोड्या-वेळांत पुन्हाः आपोआप चालू झाले. "अहो, हैद्राबादला आमच्या पोस्टल यूनियनचे वार्षिक संमेलन आम्ही खूप जोरात केलं—आणि त्याचंच यश भोवलं मला—साहित्यकानो लगेच मलाच धरलं वेठीला – मग काय, झालं आमचं यत्र सुरू—"अँडमिनिस्ट्रेटिव्ह" लाईनमध्ये दिवस गेलेले आमचे—हैद्राबादचे काशिनाथराव वैद्य वकील—वामनराव नाईक—श्रीधरपंत नाईक—झाला रामरगाडा सुरू ! आणि तिकडे अध्यक्ष डॉ० केळकर आणि त्या निमित्तानेच आपले तात्यासाहेब केळकर—दत्तोपंत पोतदार, नानासाहेब चाफेकर—वामनराव जोशी यांचे माझे संघटन वाढले ! मुंबईचे न० र० फाटक सम्मेलनाला यायला तयार नव्हते—मी जाऊन भेटलो त्यांना—त्यांची आमची पहिलीच भेटती. पण मी त्यांना भेटलो—पहिल्याच भेटीत—त्यांच्यावर रागावलो, संतापलो-त्यांना सांगितलं, "असले लाड नाही चालायचे —परिषदेचे चिटणीस तुम्ही—मराठी भाषा तुमची आहे !" आले अखेर फाटकही हैद्राबादेला. डॉ० केतकरांच्या भाषणांत थोडी खोडाखोड करावी लागली ! तिकडे निजाम सरकार—इकडे डॉ० केळकर—आणि "बफर स्टेट" सारखी आमची मध्ये कुचंबणा ! पण सगळं सम्मेलन यशस्वी झालं – पण काय सांगावं ? काव्य-गायनाच्या वेळी नेमका एक कवि अचानक उठला – आणि त्याने अफझुलखानाच्या वधाचा पोवाडा म्हटला ! निजामाच्या राज्यांत आणि अफझुलखानाचा वध ! खूप भोवला पुढे आम्हाला—पण पुढे मी लगेच

पेन्शन घेतलं—आणि सुटलो त्यातून !" रावसाहेब गेलेल्या दिवसांना आठवून खूप हसत होते !

"मग पेन्शन घेतल्यानंतर आपण पुण्यालाच आलात काय ?"

"विठ्ठलराव घाट्यांनी ते सांगितलं नाही वाटतं तुम्हाला ! नाही तर हे सर्व सांगितल्याशिवाय राहायचे नाहोत ते—पण तुम्ही मुळी विठ्ठलराव घाटे यांच्याकडे गेलाच नसाल ! त्याचं अस झालं—मला नॅचरोपाथीचा पाहिल्यापासून खूप नाद--आणि त्याचा मी खूप अभ्यासही केलेला आहे—खूप रोगो बरे केले आहेत मी—गुजराथी-पारशी. तेव्हा मी सुरतेच्या काही लोकांना वचन दिल होतं की पेन्शन घेतल्यानंतर सुरतेला येऊन राहीन म्हणून—शब्दांत बांधला गेलो होतो. मग काय करणार ?"

मी विचारले, "मग काय केलेत ?"

"—गेलो सुरतेला. थोडं पेन्शन सरकारला विकलं—त्याचे पंधरा-सोळा हजार रुपये आले—आता फक्त १३० रुपये पेन्शन मिळते मला आणि ते पंधरा-सोळा हजार रुपये—नॅचरोपाथी वगैरे नादांत सर्व गेले ! नॅचरोपाथीनं फार चांगला गुण येतो हे पण आपणाला माहीत असेलच. "बर्फी" नॅचरोपाथीत येत नाही. आणि "बर्फी" मला खूप आवडते—आणि आता गंमत पाहा—विठ्ठलराव घाटे बर्फीवरून या म्हाताऱ्याची चेष्टा करतात ! विठ्ठलराव घाटे यांची आणि माझी ओळख देवदत्त टिळकांमुळे--विठ्ठलरावांची "तो पाहा महात्मा आला" ही कविता वाचली आहेत तुम्ही ?—फार छान—!"

रावसाहेब पुनः मध्ये एक-दोन मिनिटे थांबले. नदोच्या पात्रात उभे

राहून—आपण नदीचे पाणी प्यायचे असले तर ज्याप्रमाणे आपण पहिल्यांदा दोनही हातांनी पाण्याचे वरचे थर बाजूला करतो आणि मग मधल्या पाण्याने चूळ भरतो—त्याप्रमाणे गेलेला प्रवाह रावसाहेबांनी मनातल्या मनांत थोडा हलवला. आणि म्हटले, "हं, सुरतेचं सांगायचं राहिलं. तिथं 'महाराष्ट्र मंडळ' मी स्थापन केलं—आणि पहिल्यांदा तेथे गणेशोत्सवाची वर्गणी जमेना. मी बाहेर पडलो. तेथे एक कर्नल प्रार्थना समाजिस्ट होते-ते म्हणाले, "आम्ही कशी वर्गणी द्यायची—आम्ही मूर्तिपूजा"—पण मी लगेच म्हटले"—अहो, पण मी ख्रिश्चन असून पांच रुपये वर्गणी दिली आहे—' झालं; दिली त्यांनीही-हे उत्सव, खरे सामजिक संघटनेकरिता असतात—अरे, आम्हांला तुम्ही विनाकारण ख्रिश्चन म्हणून वेगळे काढता—जसे आपणा हिंदूत बौद्ध आहेत, जैन आहेत, पण ते बौद्ध-जैन असले तरी ते हिंदूच—तसेच आम्ही हिंदू पहिल्यांदा—आणि नंतर ख्रिस्ती—अरे, आमच्या घरी या तुम्ही—तुमच्या घरांत वावरल्यासारखं वाटेल तुम्हांला—घरी आम्ही धोतरच नेसतो—अहो तात्यासाहेब केळकरांनी सुद्धा आमच्या सोवळेपणाबद्दल उल्लेख केला आहे, असे ऐकल आहे मी—आमच्याच वयाचे ते—अहो, आपले नाना राजवाडे—त्यांच्या पत्नींचे सोवळे ओवळे फार कडक—पण नंतर आमच्या इथे त्यांची ये जा सुरू होतांच—मग नाही टिकल त्यातलं काही !—अहो, त्यांच्या आमच्यांत फरकच नव्हता काही !-हं-सुरतेचा गणेशोत्सव—तिथं दत्तोपंत पोतदारांची व्याख्यानं मी करवली—काय वक्तृत्व आहे दत्तोपंतांचे ! अहो जोशीबुवा—तुम्ही आमच्यासारख्यांच्या मुलाखती घेऊन वेळ फुकट घालवता—ते दत्तोपंतांकडे जाऊन बसत जा—आणि ते बोलतील ते लिहून घ्या—मराठी वाङ्मयाचे कल्याण होईल

तुमच्या हातून !—पुढे धनंजयराव गाडगिळांनी आम्हांला गोत्यांत आणलं—आणि सूरत सोडून-मुंबईला-महाराष्ट्र संघटनाकरिता मुंबईला आलो आणि मग मराठी भाषेबद्दल गळ घालून-धनंजयरावांनी आम्हांला पुण्याला आणलं"—आणि इथे रावसाहेब चवताळले !

"तुम्ही साहित्यिक फार लुच्चे—गप्पा मारणारे—अहो, काही काही साहित्यिकांकडे अजून तीन-तीन वर्षांच्या परिषदेच्या वर्गण्या आहेत—मी म्हणतो मला काय करायचं आहे—काम तुमचं आहे—मराठी भाषेचा संसार तुमचा आहे—तो तुमचा साहित्यिकांचा संसार मी म्हातारा जुळवून देतो आहे—आलो तेव्हा २५० वर्गणीदार होते –आज हजाराजवळ आहेत ! अहो, जप्त वाङ्मय जे काही सुटल आहे त्याबद्दल आमची-तात्यासाहेबांची आणि कित्येकांची खटपट—तुम्हाला लोकांना ठाऊक नाही—असं पत्र-व्यवहारांत सतावलं होतं सरकारला—फुकट नाही सुटली कांही जप्त पुस्तकं !"

आतापर्यंत मेलेल्या साहित्यिकांच्या स्मारकाकरिता अनेक फंड निघाले आणि नंतर त्यांचे काय झाले ते पुष्कळांना कळले नाही. कै. माधवराव पटवर्धन-हे खरे भाग्यवान ठरले—कै. माधवराव पटवर्धनांचे टोलेजंग स्मारक आज उभे राहिले—अनेकांचे श्रम त्याला कारण आहेत हे मान्य-त्या स्मारकामागे रावसाहेब र. लु. जोशी नसते तर ?—आणि आघाडीवर विठ्ठलराव घाटे नसते तर ?—"

"—जोशीबुवा या डिसेंबरांत मात्र आपण आता साहित्यपरिषद सोडणार ! खूप त्रास होतो आता. बायका मुली फार चिडतात माझ्यावर—मी ही साहित्याची रिकामी उठाठेव करतो म्हणून-पण दरवर्षी मला

त्यांची परवानगी काढावी लागते—मुलीचे आजच पत्र आले आहे ते पहा—पण मी त्यांना सांगतो, "मी जगावं अशी तुमची इच्छा असेल तर मला हे काम करू द्या—मला समाधान आहे त्यांत—नाही तर मी फार दिवस जगणार नाही—आता या डिसेंबर अखेर सोडीन म्हणतो—पाहू काय होते ते !"

मराठी भाषेकरिता-कष्टणारा हा म्हातारा-

दीर्घायु होवो !

रावसाहेबांशी बोलतांना खूप गंमत येते. मी नांव घेत नाही कुणाचे-पण एखाद्या प्रसंगाने ऐखाद्याचे नांव निघाले की त्या प्रसंगाच्या अनुरोधाने त्याच्याबद्दल ऐकदम—'चावट' 'लुच्चे' वगैरे शब्द येत-आणि गंमत ही की त्याच माणसाचे नांव दुसऱ्या प्रसंगात आले आणि तेथे त्याचा संदर्भ जर चांगला असला, तर लगेच रावसाहेब म्हणत—"त्याच्यासारखा चांगला माणूस नाही।" बोलण्याच्या ओघांत "मी खरं सांगतो तुम्हांला" "विचारा वाटेल त्याला" "खोट नाही सांगत मी" "लोक मला भोळा समजतात" असे—झुळूझुळू वाहणाऱ्या प्रवाहांत मधून मधून दगडगोटे पडलेले असावेत तसे—वारंवार भेटतात. या हिशोबी माणसालाही मासिक खर्चाला पैसे त्यांच्या पत्नीकडून नेमके मिळतात—आणि त्याचाही त्यांना हिशोब द्यावा लागतो म्हणे—काय जुलूम आहे ! या प्रकाराला मी नवरा-बायकोचे प्रेम म्हणायला तयार नाही.

"माया !"

—आल्या गेल्याचे संदेश—जीविताचे संदेश—मी मानीत नाही ! तो

संदेशाचा मला गंभीर विनोद वाटतो. पण 'संदेशाची' चीड असलेल्या मीने रावसाहेबांना विचारले, रावसाहेब; आपल्या जीविताचा संदेश काय ?"

"कॉंकर ईव्हल बाय गुड !"

रावसाहेब र. लु. जोशी साहित्यिकांना ते परिचित आहेत—वर्गणी मागायला आले म्हणजे ते जरा त्रासदायक वाटत असतील—पण एरव्ही ? पण मराठी भाषा बोलणाऱ्या कित्येकांना त्यांचा आज परिचयही नसेल किंवा त्यांचे नावही माहित नसेल. पायाच्या दगडांचे नेहमी असेच असते ! रावसाहेबांची निष्ठा, कार्याची तळमळ—आणि कोणत्याही कार्यांत अंतःकरण ओतण्याचा त्यांचा निसर्गसिद्ध स्वभाव—आणि या म्हातारपणी—आणि वागणुकीतला प्रेमळपणा—मला रावसाहेब र. लु. जोशी भेटले की, कै० गडकऱ्यांच्या भावबंधन नाटकांतील प्रेमळ धुंडीराज भेटल्यासारखे वाटते !

रावसाहेब र. लु. जोशी यांचे आज साहित्य परिषदेतही कित्येका-बरोबर पटत नाही—कारण रावसाहेबांच्या बरोबर काम करायला कोणीच टिकत नाही ! रावसाहेबांनी आपले उर्वरित आयुष्य परिषदेला वाहिले असले—तरी सर्व लोकांना ते कसे शक्य आहे आणि इष्ट आहे ? त्यामुळे रावसाहेबांविषयी संपूर्ण आदर असूनही, कित्येक मंडळी आज रावसाहेबांवर मनांतून नाराज आहेत-आणि रावसाहेबसुद्धा !

रावसाहेब र. लु. लेखक-नव्हे, कवी-होते असे त्यांच्याच तोंडून कळले मला-ठीक आहे ! पण मराठी वाङ्मयाची बैठक नीट व्हायला

अशोच माणसे पाहिजेत. रावसाहेबांसारखी साधी-प्रेमळ-सामान्य-पण मोठी । कारण मराठीचे आघाडीचे वाङ्मयवीर-सध्या फारच अवखळ झाले आहेत-त्यांना सांभाळता सांभाळता नाकीनऊ आले आहेत-एकमेकांच्या अध्यसपणाच्या वर्ण्या लावण्याकरिता-एकमेकांच्या गलिच्छ आणि हीन लिखाणांची तरफदारी करण्याकरिता-आपआपले स्वतंत्र फड माजवीत बसले आहेत-आणि त्यामुळे 'मराठीतील हो मोठी माणसे नसती तर बरे' असे म्हणण्याची पाळी येते-आणि लेखक किंवा कवि नसलेला रावसाहेब-मराठो वाङ्मयाकरिता उन्हातान्हाची वणवण करीत हिंडताना पाहिला की मराठी वाङ्मयाला आता असे म्हातारे पाहिजेत-असे म्हणावेसे वाटते !

* * *